| | | |
|---|---|---|
| ४१८६. असे | अज्ञान तयाचां ठायीं । ठेविलें असे पाहीं । या बोला आन नाहीं । सत्य मानीं | ज्ञाने.१३.११.६७१ |
| ४१८७. असे | तो जाण निखळा । अज्ञानाचा पुतळा । जो बांधोनि असे डोळां । वित्ताशेतें | ज्ञाने.१३.११.६८३ |
| ४१८८. असे | तयाचां ठायीं उदंड । अज्ञान असे वितंड । जो चांचल्यें भावंड । मर्कटाचें | ज्ञाने.१३.११.६९१ |
| ४१८९. असे | जिणेयाचेनि विश्वासें । मृत्यु एक एथ असे । हें जयाचेनि मानसें । मानिजेना | ज्ञाने.१३.११.७३७ |
| ४१९०. असे | गव्हारु निद्रासुखें । घर जळत असे तें न देखे । नेणतां जेंवीं विखें । रांधिलें अन्न | ज्ञाने.१३.११.७४१ |
| ४१९१. असे | तैसा जीविताचेनि मिषें । हा मृत्युचि आला असे । हें नेणेचि राजसें । सुखें जो गा | ज्ञाने.१३.११.७४२ |
| ४१९२. असे | तंव तंव अधिकाधिकें । मरण आयुष्यातें जिंके । मीठ जैसें उदकें । घांसिजत असे | ज्ञाने.१३.११.७४९ |
| ४१९३. असे | आणि अध्यात्मज्ञान कहीं । जेणें मानिलेंचि नाहीं । तो ज्ञानार्थु न देखे काई । हें बोलावें असे | ज्ञाने.१३.११.८४२ |
| ४१९४. असे | आणि साचचि जरी नाहीं । तरि महदादिक कोणें ठाईं । स्फुरत कैचें काई । तेणेंवीण असे | ज्ञाने.१३.१२.८७० |
| ४१९५. असे | जैसी भांडघटशरावीं । तदाकारें असे पृथ्वी । तैसें सर्व होऊनियां सर्वीं । असे जे वस्तु | ज्ञाने.१३.१२.८७२ |
| ४१९६. असे | जैसी भांडघटशरावीं । तदाकारें असे पृथ्वी । तैसें सर्व होऊनियां सर्वीं । असे जे वस्तु | ज्ञाने.१३.१२.८७२ |
| ४१९७. असे | आणि समस्तांही ठाया । एके काळीं धनंजया । आलें असे म्हणोनि जया । विश्वांघ्रि नांव | ज्ञाने.१३.१३.८७५ |
| ४१९८. असे | आणि वस्तुमात्रीं गगन । जैसें असे संलग्न । तैसें शब्दजातीं कान । सर्वत्र जया | ज्ञाने.१३.१३.८८१ |
| ४१९९. असे | म्हणोनि आम्ही तयातें । म्हणों सर्वत्र आइकतें । एवं जें सर्वांतें । आवरूनि असे | ज्ञाने.१३.१३.८८२ |
| ४२००. असे | पैं कल्लोळातें कल्लोळें । ग्रसिजत असे ऐसें कळे । परि ग्रसितें ग्रासावेगळें । आहे काई | ज्ञाने.१३.१३.८८५ |
| ४२०१. असे | तेंचि आतां अवधारीं । इयें नेत्रगोचरें आकारीं । तें ज्ञेय जियापरी । व्यापक असे | ज्ञाने.१३.१३.८९० |
| ४२०२. असे | तरी तें गा किरीटी ऐसें । अवकाशीं आकाश जैसें । पटीं पटु होऊनि असे । तंतु जेवीं | ज्ञाने.१३.१४.८९१ |
| ४२०३. असे | कर्पूरत्वें कापुरीं । सौरभ्य असे जयापरी । शरीर होऊनि शरीरीं । कर्म जेवीं | ज्ञाने.१३.१४.८९३ |
| ४२०४. असे | किंबहुना जैसें पांडवा । सोनेंचि सोनयाचा रवा । तैसें जें या सर्वां । सर्वांगी असे | ज्ञाने.१३.१४.८९४ |
| ४२०५. असे | अगा क्षीराचिये दशे । घृत क्षीराकारें असे । परि क्षीरचि नोहे जैसें । कपिध्वजा | ज्ञाने.१३.१४.९०१ |
| ४२०६. असे | जें चराचर भूतां- । माजीं असे पांडुसुता । नाना वन्हीं उष्णता । अभेदें जैसी | ज्ञाने.१३.१५.९१२ |
| ४२०७. असे | तैसेनि अविनाशभावें । जें सूक्ष्मदशे आघवें । व्यापूनि असे तें जाणावें । ज्ञेय एथ | ज्ञाने.१३.१५.९१३ |
| ४२०८. असे | जें मेदिनीची मेदिनी । जे पाणी पिऊनि असे पाणी । तेजा दिवेलावणी । जेणें तेजें | ज्ञाने.१३.१७.९३२ |
| ४२०९. असे | किंबहुना पांडवा । जें आघवेंचि असे आघवा । जेथ नाहीं रिगावा । द्वैतभावासी | ज्ञाने.१३.१७.९३४ |
| ४२१०. असे | अर्जुना जिये ठायीं । न सरे द्वैताची वही । हें असो जें हृदयीं । सर्वांचां असे | ज्ञाने.१३.१७.९३८ |
| ४२११. असे | आणि क्षेत्रज्ञु ऐसें । जयातें म्हणितलें असे । तो पुरुष हें अनारिसें । न बोलों घेई | ज्ञाने.१३.१९.९६३ |
| ४२१२. असे | हे अद्वयाचें दुसरें । हे नि:संगाचें सोयरें । हें निराळेंसि घरें । नांदत असे | ज्ञाने.१३.२१.९९६ |

| | | |
|---|---|---|
| ४२१३. असे | तेथ पुरुषत्व जें असे । तें ये इये प्रकृतिदशे । चंद्रमा अंवसे । पडिला जैसा | ज्ञाने.१३.२१.१००७ |
| ४२१४. असे | तो शरीराचेनि मेळें । करू कां कर्में सकळें । परि आकाश धुये न मैळे । तैसा असे | ज्ञाने.१३.२३.१०३२ |
| ४२१५. असे | भूतें आघवींचि होती । एकाचीं एक आहाती । परी पैं भूतप्रतीतीं । वेगळीक असे | ज्ञाने.१३.२७.१०५७ |
| ४२१६. असे | अंगारकणीं बहुवसीं । उष्णता समान जैसी । तैसा नाना जीवराशीं । परेशु असे | ज्ञाने.१३.२७.१०६२ |
| ४२१७. असे | दीपांचां कोडीं जैसें । एकचि तेज सरिसें । तैसा जो असे । सर्वत्र ईशु | ज्ञाने.१३.२८.१०७६ |
| ४२१८. असे | कां जे जळा आदीं पाठीं । सूर्य असतुचि असे किरीटी । माजीं बिंबें तें दृष्टी । आणिकांचिये | ज्ञाने.१३.३१.१०९४ |
| ४२१९. असे | आरिसां मुख जैसें । बिंबलिया नाम असे । देहीं वसणें तैसें । आत्मतत्त्वा | ज्ञाने.१३.३१.१०९६ |
| ४२२०. असे | तैसा सर्वत्र सर्व देहीं । आत्मा असतुचि असे पाहीं । संगदोषें एकेंही । लिप्तु नव्हे | ज्ञाने.१३.३२.११२० |
| ४२२१. असे | काष्ठांचां पोटीं । वन्हि असे किरीटी । परी काष्ठ नोहे या दिठी । पाहिजे गा | ज्ञाने.१३.३३.११२४ |
| ४२२२. असे | कीं तो पार्थु जी मनीं । अझुनी तृप्ती न मनी । अधिकाधिक उतान्ही । वाढवीतु असे | ज्ञाने.१३.३४.११४७ |
| ४२२३. असे | कां उदयलिया भास्वतु । चंद्र जैसा खद्योतु । आम्हां श्रुती तुजआंतु । तो पाडु असे | ज्ञाने.१४.१३ |
| ४२२४. असे | अनादि जे मुक्तता । आपुली असे पंडुसुता । तो मोक्षु हाता येता । होय येणें | ज्ञाने.१४.१.४८ |
| ४२२५. असे | आतां देवाचिया ऐसें । जाकळीजतु असे वोरसें । म्हणौनि निरूपण आकाशें । वेंटाळेना | ज्ञाने.१४.२.६२ |
| ४२२६. असे | आणिकही एक असे । जें विचारावेळे न दिसे । वातीं पाहतां जैसें । आंधारें कां | ज्ञाने.१४.३.७२ |
| ४२२७. असे | पैल खांब कां पुरुखु । ऐसा निश्चयो नाहीं एकु । परी काय नेणो आलोकु । दिसत असे | ज्ञाने.१४.३.७६ |
| ४२२८. असे | तेवीं वस्तु जैसी असे । तैसी कीर न दिसे । परी कांहीं अनारिसें । देखिजेना | ज्ञाने.१४.३.७७ |
| ४२२९. असे | जैसें कां स्वप्नमोहा । तो एकाकी देखिजे बहुवा । तोचि पाडु आत्मया । स्मरणेंवीण असे | ज्ञाने.१४.३.८५ |
| ४२३०. असे | अज्ञानाचें जियालें । तया एका लागलें । जेणें विश्व भुललें । नाचत असे | ज्ञाने.१४.८.१७५ |
| ४२३१. असे | मग गोमटेया तया । जावळी असे धनंजया । तेवीं सत्त्वीं जाणे देहा । कें आथि गा | ज्ञाने.१४.११-१५.२१७ |
| ४२३२. असे | ऐसें सर्व जें सर्वोत्तम । जालें असे जया सुगम । तयासवें निरुपम । लाहे देह | ज्ञाने.१४.११-१५.२२५ |
| ४२३३. असे | तैसे मध्योर्ध्वअध । हे जे गुणवृत्तिभेद । ते दृष्टीवांचूनि शुद्ध । वस्तुचि असे | ज्ञाने.१४.१८.२७८ |
| ४२३४. असे | ऐसी मुक्ति असे सहज । ते आतां परिसऊं तुज । जे तूं ज्ञानांबुज- । द्विरेफु कीं | ज्ञाने.१४.१९.२८६ |
| ४२३५. असे | तैसें गुणीं गुणापरौतें । जें आपणपें असे आयितें । तिये अहं बैसे अहंते । मूळकेचिये | ज्ञाने.१४.१९.२९२ |
| ४२३६. असे | सत्त्वरजतमांचां । भेदीं पसरु कर्मांचा । होत असे तो गुणांचा । विकारु हा | ज्ञाने.१४.१९.२९४ |
| ४२३७. असे | आतां निर्गुण असे आणिक । तें तो जाणे अचुक । जे ज्ञानें केलें टीक । तयाचिवरी | ज्ञाने.१४.२०.३०० |
| ४२३८. असे | घटाचिया खापरिया । घटभंगीं फेडिलिया । महदाकाश आपैसया । जालेंचि असे | ज्ञाने.१४.२०.३१६ |
| ४२३९. असे | यया अर्जुनाचिया प्रश्ना । तो षड्गुणांचा राणा । परिहारु आकर्णा । बोलतु असे | ज्ञाने.१४.२१.३२२ |

| | | |
|---|---|---|
| ४२४०. असे | सायंप्रातर्मध्यान्हा । या तिही काळांची गणना । नाहीं जेवीं तपना । तैसा असे | ज्ञाने.१४.२२.३३२ |
| ४२४१. असे | तया वेगळाचि काय प्रकाशें । ज्ञानित्व यावें असे । कायि जळार्णव पाउसें । साजा होय | ज्ञाने.१४.२२.३३३ |
| ४२४२. असे | नातरी मोह आलिया । काइ पां ज्ञाना मुकिजेल तया । महा आगीतें उन्हाळेया । जाळवत असे | ज्ञाने.१४.२२.३३५ |
| ४२४३. असे | सत्कर्मे सात्त्विकीं । रज तें रजोविषयकीं । तम मोहादिकीं । वर्तत असे | ज्ञाने.१४.२३.३४४ |
| ४२४४. असे | सुखे ना शिणे । पाषाणु कां जेणें मानें । तैसी सांडीमांडी मनें । वर्जिली असे | ज्ञाने.१४.२५.३६८ |
| ४२४५. असे | नुकलितां पटु । तंतुचि असे स्पष्टु । न विरवितां घटु । मृत्तिका जेवीं | ज्ञाने.१४.२६.३७९ |
| ४२४६. असे | तेजाचा तेजौनि निघाला । परी तेजींचि असे लागला । तया रश्मी ऐसा भला । बोधु होआवा | ज्ञाने.१४.२६.३८४ |
| ४२४७. असे | परि हें असो आतां । प्रेम रुळतसे बोलतां । कें गुरुगौरव वर्णितां । उन्मेष असे | ज्ञाने.१५.२७ |
| ४२४८. असे | आतां विरक्तीची कवण परी । जे येऊनि मनातें वरी । हेंही सर्वज्ञें श्रीहरी । देखिलें असे | ज्ञाने.१५.३७ |
| ४२४९. असे | आतां अनित्यत्व या कैसें । तेंचि वृक्षाकारमिषें । सांगिजत असे विश्वेशें । पंचदशीं | ज्ञाने.१५.४० |
| ४२५०. असे | तो हा जगडंबरु । नोहे येथ संसारु । हा जाणें महातरु । थांवला असे | ज्ञाने.१५.४७ |
| ४२५१. असे | अर्जुना हें कवतिक । सांगतां असे अलौकिक । जे वाढी अधोमुख । रुखा यया | ज्ञाने.१५.५१ |
| ४२५२. असे | कां रवीचां अस्तमानीं । आंधारेनि कोंदे रजनी । तैसा हाचि गगनीं । मांडला असे | ज्ञाने.१५.५४ |
| ४२५३. असे | आणि ऊर्ध्वमूळ ऐसें । निगदिलें कीर असे । परी अधींही असोसें । मूळें यया | ज्ञाने.१५.५७ |
| ४२५४. असे | जालें गगनचि पां वेलीये । कां वारा मांडला रुखाचेनि आयें । नाना अवस्थात्रयें । उदयला असे | ज्ञाने.१५.६१ |
| ४२५५. असे | परी ऐकें गा सुभगा । हा प्रसंगु असे तुजचि जोगा । कानचि करी हो सर्वांगा । हियें आथिलिया | ज्ञाने.१५.६७ |
| ४२५६. असे | ऐसें वस्तु जें साचें । तें ऊर्ध्व गा यया तरूचें । तेथ आर घेणें मूळाचें । तें ऐसें असे | ज्ञाने.१५.१.७९ |
| ४२५७. असे | ते माया वस्तूचां ठायीं । असे जैसेनि नाहीं । मग वस्तुप्रभाचि पाही । प्रगट होय | ज्ञाने.१५.१.८४ |
| ४२५८. असे | एऱ्हवीं पिंपळु घडतां विखीं । मियां गति देखिली असे निकी । परी तें असो काय लौकिकीं । हेतु काज | ज्ञाने.१५.१.११६ |
| ४२५९. असे | आणीकही येकु थोरु । यया अव्ययत्वाचा डगरु । आथी परी तो भीतरु । ऐसा असे | ज्ञाने.१५.१.११८ |
| ४२६०. असे | जातां वेगें बहुवसें । न वचे कां भूमी रुतलें असे । रथाचें चक्र दिसे । जिया परी | ज्ञाने.१५.१.१२३ |
| ४२६१. असे | आणि हिंसाविषयपुढारी । कुकर्मसंगें धुरधुरी । जन्मवरी आगारी । वाढतीचि असे | ज्ञाने.१५.२.१७२ |
| ४२६२. असे | पुढां उपरति रागें लोहिवी । धर्ममोक्षाची शाखा पालवी । लाहलाहात नित्य नवी । वाढतीचि असे | ज्ञाने.१५.२.१९४ |
| ४२६३. असे | परी तुझां हन पोटीं । ऐसें गमेल किरीटी । जे एवढें झाड उत्पाटी । ऐसें कायि असे | ज्ञाने.१५.३.२१० |
| ४२६४. असे | कें ब्रह्मयाचां शेवटवरी । ऊर्ध्व शाखांची थोरी । आणि मूळ तंव निराकारीं । ऊर्ध्वीं असे | ज्ञाने.१५.३.२११ |
| ४२६५. असे | हा स्थावराही तळीं । फांकत असे अधींचां डाळीं । माजीं धांवतसे दुजां मूळीं । मनुष्यरूपीं | ज्ञाने.१५.३.२१२ |
| ४२६६. असे | वांचूनि आम्हीं निरूपिलें जैसें ।ययाचें अचळ मूळ असे तैसें । आणि तैसाचि जरी हा असे । साचोकारा | ज्ञाने.१५.३.२१९ |

| | | |
|---|---|---|
| ४२६७. असे | वांचूनि आम्हीं निरूपिलें जैसें । ययाचें अचळ मूळ असे तैसें । आणि तैसाचि जरी हा असे । साचोकारा | ज्ञाने.१५.३.२१९ |
| ४२६८. असे | जैंसें घटाचें नाहींपण । असतचि असे केलेनिवीण । तैसा समूळ वृक्ष जाण । अनादि हा | ज्ञाने.१५.३.२३६ |
| ४२६९. असे | हें पाहाणें ऐसें असे वीरा । जैसा न मोडलिया विहिरा । मग आपलिया उगमीं झरा । भरोनि ठाके | ज्ञाने.१५.४.२६९ |
| ४२७०. असे | आपणचि आपणयातें । पाहिजे जें अद्वैतें । तें ऐसें होय निरुतें । बोलिजतु असे | ज्ञाने.१५.४.२७४ |
| ४२७१. असे | आणीकही एक तया । वोळखण असे धनंजया । तरी जया कां भेटलिया । येणेंचि नाहीं | ज्ञाने.१५.४.२८३ |
| ४२७२. असे | कां नाडरचि भरे शोषे । सूर्यु तो जैसा तैसाचि असे । देह होतां जातां तैसें । देखती मातें | ज्ञाने.१५.१०-११.३८७ |
| ४२७३. असे | घट मठु घडले । तेचि पाठीं मोडले । परि आकाश तें संचलें । असतचि असे | ज्ञाने.१५.१०-११.३८८ |
| ४२७४. असे | ते आपेआप देखोनि देखीं । मियां आत्मेनि सदा सुखी । येथें मीवांचून अवलोकीं । आन हेतु असे | ज्ञाने.१५.१५.४२४ |
| ४२७५. असे | यया बोला तो शार्ङ्गी । तेंचि सांगावयालागीं । उपाधी दोहीं भागीं । निरूपीत असे | ज्ञाने.१५.१५.४६२ |
| ४२७६. असे | बाबुळीचि सारावी हातें । परी पाणी तंव असे आइतें । अभ्रचि जावें गगन तें । सिद्धचि कीं | ज्ञाने.१५.१५.४६५ |
| ४२७७. असे | वरील कोंड्याचा गुंडाळा । झाडूनि केलिया वेगळा । कणु घेतां विरंगोळा । असे काई | ज्ञाने.१५.१५.४६६ |
| ४२७८. असे | तया एका नाम क्षरु । येरातें म्हणती अक्षरु । इहीं दोहींचि परी संसारु । कोंदला असे | ज्ञाने.१५.१६.४७६ |
| ४२७९. असे | तें आघवेंचि साकारें । कल्पूनी आपणपयां पुरें । जालें असे तदनुसारें । चैतन्यचि | ज्ञाने.१५.१६.४८६ |
| ४२८०. असे | कां सलिलीं असतचि असे । व्योमावरी व्योम बिंबे जैसें । अद्वैत होऊनि तैसें । द्वैतें घेपे | ज्ञाने.१५.१६.४८८ |
| ४२८१. असे | जेथुनि अन्यथाज्ञान । फांकोनि जागृति स्वप्न । नानाबुद्धीचें रान । रिगालें असे | ज्ञाने.१५.१६.५१३ |
| ४२८२. असे | कां घ्राणा फुला दोहीं । द्रुती असे जे माझारिलां ठायीं । ते न दिसे तरी नाहीं । ऐसें बोलों नये | ज्ञाने.१५.१७.५४३ |
| ४२८३. असे | जो प्रकाश्येंवीण प्रकाशु । ईशितव्येंवीण ईशु । आपणेनीचि अवकाशु । वसवीत असे जो | ज्ञाने.१५.१७.५४५ |
| ४२८४. असे | कां नाना अलंकारदशे । सोनें न लपत लपालें असे । विश्व न होनियां तैसें । विश्व जो धरी | ज्ञाने.१५.१७.५५१ |
| ४२८५. असे | तें श्रीकृष्णवदनामृत । पार्थीं भरोनि असे वोसंडत । मग व्यासकृपा प्राप्त । संजयासी | ज्ञाने.१५.२०.५८८ |
| ४२८६. असे | ऐसा जिज्ञासु तुम्हीं समस्तीं । भावो जो धरिला असे चित्तीं । तो पुरवावया लक्ष्मीपती । बोलिजेल | ज्ञाने.१६.५८ |
| ४२८७. असे | तेथ साउमा घेयावा उवावो । तंव वोडवला आन प्रस्तावो । तरी तयां प्रसंगें आतां देवो । निरूपीत असे | ज्ञाने.१६.६२ |
| ४२८८. असे | अथवा अनारिसें । तपाचें रूप जरी असे । तरी जाण जेवीं दुधीं हंसें । सूदली चांचू | ज्ञाने.१६.१.१०९ |
| ४२८९. असे | किंबहुना तृषितालागीं । पाणी आरायिलें असे जगीं । तैसें दु:खितांचां सेलभागीं । जिणें जयाचें | ज्ञाने.१६.२.१६१ |
| ४२९०. असे | तियें गर्भमेदमुसें । रक्तमूत्ररसें । वोंतीव होऊनि असे । तें लाजिरवाणें | ज्ञाने.१६.२.१८० |
| ४२९१. असे | आतां निर्वाळूनि कनकें । भरिला गांगें पीयूखें । तया कलशाचियासारिखें । शौच असे | ज्ञाने.१६.३.१९७ |
| ४२९२. असे | एवं इहीं सव्विसें । ब्रह्मसंपदा हे वसत असे । मोक्षचक्रवर्तीचें जैसें । अग्रहार होय | ज्ञाने.१६.३.२०७ |
| ४२९३. असे | कीं गुणकुसुमांची माळा । हे घेऊनि मुक्तिबाळा । वैराग्यनिरपेक्षाचा गळा । गिंवसीत असे | ज्ञाने.१६.३.२०९ |

| | | |
|---|---|---|
| ४२९४. असे | म्हणे ईश्वरातें खायें । तया वेदा विष सूयें । गौरवामाजीं त्राये । भंगीत असे | ज्ञाने.१६.४.२३३ |
| ४२९५. असे | हें जेतुलें असे जोडिलें । तयाचेनि भांडवलें । लाभा घेईन उरलें । चराचर हें | ज्ञाने.१६.१३.३५० |
| ४२९६. असे | जे विश्वप्रामाण्याची मुदी । आजि तुझां हातीं असे सुबुद्धी । लोकसंग्रहासि त्रिशुद्धी । योग्यु होसी | ज्ञाने.१६.२४.४६८ |
| ४२९७. असे | इयें श्लाघिजती जेणें बिकें । तें जयाचें आंगीं असिकें । तो श्रीकृष्ण स्वमुखें । बोलत असे | ज्ञाने.१७.१.४८ |
| ४२९८. असे | म्हणोनि श्रद्धा स्वाभाविक । असे पैं त्रिगुणात्मक । रजतमसात्त्विक । भेदीं इहीं | ज्ञाने.१७.३.६७ |
| ४२९९. असे | ऐसेनि हा सकळु । जगडंबरु निखिळु । श्रद्धेचाचि केवळु । वोतला असे | ज्ञाने.१७.३.७२ |
| ४३००. असे | परी गुणत्रयवशें । त्रिविधपणाचें लासें । श्रद्धे जें उठिलें असे । तें वोळख तूं | ज्ञाने.१७.३.७३ |
| ४३०१. असे | शिरच्छेदें काय होये । का आगीं रिघतां कैसें आहे । हें जाणावें काई पाहें । परी साहातुचि असे | ज्ञाने.१७.१०.१६७ |
| ४३०२. असे | आतां ययावरी । आहाराचिया परी । यज्ञुही अवधारीं । त्रिधा असे | ज्ञाने.१७.१०.१६९ |
| ४३०३. असे | म्हणौनि तियें मानसीं । भावशुद्धीचि असे अपैसीं । रोमशुचि जैसी । तळहातासी | ज्ञाने.१७.१६.२३५ |
| ४३०४. असे | येथ गुणाचेनि बोलें । दानही त्रिविध असे जालें । तेंचि आइक पहिलें । सात्त्विक ऐसें | ज्ञाने.१७.१९.२६५ |
| ४३०५. असे | जें दोहींमाजीं तिजें असे । तें दोन्हीं सांडितांचि दिसे । अहोरात्रत्यागें जैसें । संध्यारूप | ज्ञाने.१७.२२.३१५ |
| ४३०६. असे | तरी अनादि परब्रह्म । जें जगदादिविश्रामधाम । तयाचें एक नाम । त्रिधा पैं असे | ज्ञाने.१७.२३.३२८ |
| ४३०७. असे | परी कापुराचें थळींव । आणूनि देईल दैव । लेवों जाणणेंचि आडव । तेथ असे बापा | ज्ञाने.१७.२३.३४५ |
| ४३०८. असे | अगा अन्न आणि भूक । पासीं असे परी देख । जेऊं नेणतां बाळक । लंघनचि कीं | ज्ञाने.१७.२३.३५० |
| ४३०९. असे | म्हणोनि परत्वें ब्रह्म असे । तें आत्मत्वें परियवसे । सच्छब्द या रिणादोषें । ठेविला देवें | ज्ञाने.१७.२५.३७७ |
| ४३१०. असे | जें सतचि काळें देशें । होऊं नेणेचि अनारिसें । आपणपां आपण असे । अखंडित | ज्ञाने.१७.२६.३८१ |
| ४३११. असे | परी आश्रयो आकाशा । आकाशचि का जैसा । या नामा नामी आश्रयो तैसा । अभेदु असे | ज्ञाने.१७.२६.४०३ |
| ४३१२. असे | ए्हवीं तत्त्वविषयीं भला । तो निश्चितु असे कीर जाहला । परी देवो राहे उगला । तें साहावेना | ज्ञाने.१८.७७ |
| ४३१३. असे | आणि संवादाचेनि मिषें । जे अव्यवहारी वस्तु असे । तेचि भोगिजे कीं जैसें । आरिसां रूप | ज्ञाने.१८.८१ |
| ४३१४. असे | परी हें असो ऐसें । अर्जुनें पुसिजत असे । म्हणे विनंती विश्वेशें । अवधारिजो | ज्ञाने.१८.८६ |
| ४३१५. असे | त्यागें तैसा संन्यासें । त्यागुचि बोलिजतु असे । आमचेनि तंव मानसें । जाणिजे हेंचि | ज्ञाने.१८.१.८८ |
| ४३१६. असे | किंबहुना पार्था ऐसें । जें काम्यकर्म गा असे । तें त्यजिजे विष जैसें । वोकूनियां | ज्ञाने.१८.२.१०७ |
| ४३१७. असे | का सोमकांतु सोमें पघळे । सूर्यें फांकती कमळें । एथ असे तेंचि पाल्हाळे । आन नये | ज्ञाने.१८.२.११३ |
| ४३१८. असे | वासु नेदितां जैसें । चंदनीं सौगंध्य असे । अधिकाराचें तैसें । रूपचि जें | ज्ञाने.१८.२.११७ |
| ४३१९. असे | आणि नित्यादिक जें असे । तें येणें फळत्यागें नासे । शिर लोटलिया जैसें । येर आंग | ज्ञाने.१८.२.१२८ |
| ४३२०. असे | तैसा शरीराचेनि आभासें । नांदतु जंव असे । तंव कर्मत्यागाचें पिसें । काइसें तरी | ज्ञाने.१८.११.२२२ |

| ४३२१. असे | पांघरोनि नईचें उदक । असे नईचिमाजीं खडक । परी जाणसी का वेगळिक । कोडीचि ते | ज्ञाने.१८.१२.२७१ |
|---|---|---|
| ४३२२. असे | तैसी क्रियाशक्ति पवनीं । असे जे अनपायिनी । ते पडिली नाना स्थानीं । नाना होय | ज्ञाने.१८.१४.३३३ |
| ४३२३. असे | आरोगिलेनि रसें । शरीर भरी सरिसें । आणि न सांडितां असे । सर्वसंधीं | ज्ञाने.१८.१४.३३९ |
| ४३२४. असे | कर्म होतचि असे तेव्हांही । परी तें होणें नव्हे पाहीं । तो अन्यायो गा अन्यायीं । हेतु जाणावा | ज्ञाने.१८.१५.३७६ |
| ४३२५. असे | एवं पंचकारणा कर्मा । पांचही हेतु हे सुमहिमा । आतां एथें पाहे पां आत्मा । सांपडला असे | ज्ञाने.१८.१६.३७७ |
| ४३२६. असे | भानु न होनि रूपें जैसीं । चक्षुरूपातें प्रकाशी । आत्मा न होनि कर्मे तैसीं । प्रकटित असे गा | ज्ञाने.१८.१६.३७८ |
| ४३२७. असे | आतां कर्मामाजीं असे । परी तयातें कर्म न स्पर्शे । वडवानळातें जैसें । समुद्रोदक | ज्ञाने.१८.१६.३९५ |
| ४३२८. असे | आणि आकाशें जेथें जेथुनी । जाइजे तेथ असे भरोनि । म्हणोनि ठेलें कोंदोनि । आपेंआप | ज्ञाने.१८.१७.४१९ |
| ४३२९. असे | परी तया दोहींतें जैसें । नेणिजेचि कां आकाशें । तैसा देहींच जो असे । विदेहदृष्टी | ज्ञाने.१८.१७.४३५ |
| ४३३०. असे | तैसें ज्ञातेपणें जें असे । तें ये कर्ता ऐसिये दशे । जेवितें बैसलें जैसें । रंधन करूं | ज्ञाने.१८.१८.४९१ |
| ४३३१. असे | वन्हीं ठेविला असे धूमु । आथी बीजीं जेवीं द्रुमु । कां मनीं जोडे कामु । सदा जैसा | ज्ञाने.१८.१८.५१३ |
| ४३३२. असे | एवं सत्त्वरजतमा । तिहींची एवढी असे महिमा । जे त्रैविध्य आदी ब्रह्मा । अंतीं कृमी | ज्ञाने.१८.१९.५२५ |
| ४३३३. असे | तेंचि ज्ञानत्रयवशें । त्रिविध कर्म जें असे । तेथ सात्त्विक तंव ऐसें । परिस आधीं | ज्ञाने.१८.२२.५८५ |
| ४३३४. असे | तेंही करावया दोषें । मज सामर्थ्य असे कीं नसे । हेंही पुढील तैसें । न पाहतां करी | ज्ञाने.१८.२५.६२१ |
| ४३३५. असे | आतां ययाचि कर्मा भजतां । कर्माभिमानिया कर्ता । तो जीवुही त्रिविधता । पातला असे | ज्ञाने.१८.२५.६२८ |
| ४३३६. असे | तरी मी लागलिया कैसें । पुढील जळत असे । हें नेणिजे हुताशें । जियापरी | ज्ञाने.१८.२८.६६३ |
| ४३३७. असे | आत्मनिश्चयाची बरव । जया आरिसां पाहे सावयव । तिये बुद्धीचीही धांव । त्रिधा असे | ज्ञाने.१८.२९.६९१ |
| ४३३८. असे | आगी नसतां पोटीं । कवण काष्ठ असे सृष्टी । तैसें तें कैचें दृश्यकोटीं । त्रिधा जें नोहे | ज्ञाने.१८.२९.६९३ |
| ४३३९. असे | म्हणौनि तिहीं गुणीं । बुद्धी केली त्रिगुणीं । धृतीसिही वांटणी । तैसीचि असे | ज्ञाने.१८.२९.६९४ |
| ४३४०. असे | तो आळसु सूनि असे कांखे । म्हणौनि निद्रे कहीं न मुके । पापें पोषितां दुःखें । न सांडिजे जेवीं | ज्ञाने.१८.३५.७५३ |
| ४३४१. असे | तें येथ आत्मसुख । जालें असे त्रिगुणात्मक । तेंही सांगों एकैक । रूप आतां | ज्ञाने.१८.३६.७७७ |
| ४३४२. असे | पैं कोलिताही कोपे ऐसें । द्राक्षांचें हिरवेपण असे । तें परिपाकीं कां जैसें । माधुर्य आते | ज्ञाने.१८.३७.७९० |
| ४३४३. असे | आणि हे तंव त्रिपुटी । तिहीं गुणीं इहीं किरीटी । गुंफिली असे पटीं । तांतुवीं जैसी | ज्ञाने.१८.३९.८१२ |
| ४३४४. असे | तैसें वर्णाश्रमवशें । जें करणीय आलें असे । गोरेया आंगा जैसें । गोरेपण | ज्ञाने.१८.४५.८८७ |
| ४३४५. असे | जैसी दिठी असे आपुलां ठायीं । परी दीपेंवीण भोग नाहीं । मार्गु न लाहतां काई । पाय असतां होय | ज्ञाने.१८.४५.८९० |
| ४३४६. असे | म्हणौनि ज्ञातिवशें साचारु । सहज असे जो अधिकारु । तो आपुलालिया शास्त्रें गोचरु । आपण कीजे | ज्ञाने.१८.४५.८९१ |
| ४३४७. असे | मग घरींचाचि ठेवा । जेवीं डोळयां दावी दिवा । तरी घेतां काय पांडवा । आडळु असे | ज्ञाने.१८.४५.८९२ |

| | | |
|---|---|---|
| ४३४८. असे | तैसें आपलिया विहिता । उपावो असे न विसंबितां । ऐसा कीजे कीं जगन्नाथा । आभारु पडे | ज्ञाने.१८.४५.९१० |
| ४३४९. असे | यालागीं कर्म आपुलें । जें जातिस्वभावें असे आलें । तें करी तेणें जिंतिलें । कर्मबंधातें | ज्ञाने.१८.४७.९३३ |
| ४३५०. असे | तेव्हां अबोधुमात्र असे । तो तंव तया कृपा नासे । तेथ रात्रीसवें जैसें । आंधारें जाय | ज्ञाने.१८.४९.९७० |
| ४३५१. असे | तैसी अबोधाचिये कुशी । कर्म कर्ता कार्य ऐशी । त्रिपुटी असे ते जैसी । गाभिणी मारिली | ज्ञाने.१८.४९.९७१ |
| ४३५२. असे | तें आपुलें आपणपें । असे तेंचि होऊनि आरोपे । तरंगु कां वायुलोपें । समुद्रु जैसा | ज्ञाने.१८.४९.९७९ |
| ४३५३. असे | आणि मनाचा उंबरा । वृत्तीसी देखों नेदी वीरा । तेथ कें वाग्व्यापारा । अवकाशु असे | ज्ञाने.१८.५२.१०३० |
| ४३५४. असे | ऐसेनि संसाररणाआंतु । आंधारीं सूर्यु तैसा असे जातु । मोक्षविजयश्रीये वरैतु । होआवयालागीं | ज्ञाने.१८.५२.१०४९ |
| ४३५५. असे | जो जेथ जैसें पाहों बैसे । तया तेथ तैसेंचि असे । हें उजियेडें कां दिसे । अखंडें जेणें | ज्ञाने.१८.५४.१११५ |
| ४३५६. असे | दिठी चंद्रचि घे साचें । परी येतुलें हें तिमिराचें । जे एकचि असे तयाचे । दोनी दावी | ज्ञाने.१८.५४.११२३ |
| ४३५७. असे | पैं जेव्हांही असे किडाळ । तेव्हांही सोनेंचि अढळ । परी तें गेलिया केवळ । उरे जैसें | ज्ञाने.१८.५४.११२६ |
| ४३५८. असे | तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जपु माझा । तो असे तेचि कपिध्वजा । समाधी माझी | ज्ञाने.१८.५५.११८१ |
| ४३५९. असे | तैसा मी तो हें जें असे । तें स्वानंदानुभवसमरसें । कालवूनियां प्रवेशे । मजचिमाजीं | ज्ञाने.१८.५५.१२०९ |
| ४३६०. असे | तैसा आत्मदर्शनीं आडळु । असे अविद्येचा जो मळु । तो शास्त्र नाशी येरु निर्मळु । मी प्रकाशें स्वयें | ज्ञाने.१८.५५.१२३२ |
| ४३६१. असे | तैं महासिद्धांताचा आवांका । सिद्धांतकक्षा अनेका । भिडऊनि आरंभु देखा । संपवितु असे | ज्ञाने.१८.५५.१२४२ |
| ४३६२. असे | किंबहुना पांडुसुता । मज आत्मयाची प्रसन्नता । लाहे तेणें न पविजतां । लाभु कवणु असे | ज्ञाने.१८.५६.१२५९ |
| ४३६३. असे | तें अदृष्ट अनारिसें । न करील ईश्वरवशें । तो ईश्वरुही असे । हृदयीं तुझां | ज्ञाने.१८.६०.१२९८ |
| ४३६४. असे | सर्व भूतांचां अंतरीं । हृदयमहाअंबरीं । चिद्वृत्तीचां सहस्त्रकरीं । उदयला असे जो | ज्ञाने.१८.६१.१२९९ |
| ४३६५. असे | असो रूपक हें तो ईश्वरु । सकल भूतांचा अहंकारु । पांघरोनि निरंतरु । उल्हासत असे | ज्ञाने.१८.६१.१३०२ |
| ४३६६. असे | तैसीं बीजप्रकृतिवशें । अनेकें भूतें येकें ईशें । चेष्टविजती तो असे । तुझां हृदयीं | ज्ञाने.१८.६१.१३१४ |
| ४३६७. असे | तेथ पार्थु म्हणे दातारा । भलें जाणसी माझिया अंतरा । हें म्हणों तरी दुसरा । जाणता असे काई | ज्ञाने.१८.६३.१३३८ |
| ४३६८. असे | तैसें पार्था तुझेनि मिषें । मी बोलें आपणयाचि दोषें । माझां तुझां ठाईं असे । मीतूंपण गा | ज्ञाने.१८.६४.१३४८ |
| ४३६९. असे | म्हणौनि औदार्या तुझेया । मज निमित्त ना म्हणावया । प्राप्ति असे दानीं राया । कृपानिधी | ज्ञाने.१८.६५.१३७८ |
| ४३७०. असे | तैसें मजसीं येकवटलेया । मी सर्वरूप वांचूनियां । आन कांहीं उरावया । कारण असे | ज्ञाने.१८.६६.१४११ |
| ४३७१. असे | म्हणौनि वेदां मूळभूत । गीता म्हणों हें होय उचित । आणिकही येकी येथ । उपपत्ति असे | ज्ञाने.१८.६६.१४२९ |
| ४३७२. असे | तरी कांडत्रयात्मकु । शब्दराशी अशेखु । गीतेमाजीं असे रुखु । बीजीं जैसा | ज्ञाने.१८.६६.१४३१ |
| ४३७३. असे | निपजे दिव्यान्न चोखट । परी माजीं असे काळकूट । हें असो मैत्री कपट- । गर्भिणी जैसी | ज्ञाने.१८.६७.१५०३ |
| ४३७४. असे | आणि देहाचेंही लेणें । लेऊनि वेगळेपणें । असे तंव जीवेंप्राणें । तोचि पढिये | ज्ञाने.१८.६९.१५१४ |

| | | |
|---|---|---|
| ४३७५. असे | गीतापाठकासि असे । फळ अर्थज्ञाचि सरिसें । गीतामाउलिये कीं नसे । जाणेंतान्हें | ज्ञाने.१८.७०.१५२८ |
| ४३७६. असे | हां गा स्वाज्ञानजनितें । मागिलें मोहें तूतें । भुलविलें तो येथें । असे कीं नाहीं | ज्ञाने.१८.७२.१५४४ |
| ४३७७. असे | आतां मोह असे कीं नाहीं । हें ऐसें जी पुससी काई । कृतकृत्य जाहलों पाहीं । तुझेपणें | ज्ञाने.१८.७३.१५६२ |
| ४३७८. असे | वरी जुंझाचें निर्वाण । मांडलें असे दारुण । दोहीं हारीं आपण । हारपिजे जैसें | ज्ञाने.१८.७३.१५८२ |
| ४३७९. असे | अद्वयानंदपरिसें । दिठी रसमय जाली असे । ते अश्रु नव्हती जैसें । द्रवत्वचि | ज्ञाने.१८.७४.१६०४ |
| ४३८०. असे | न देखणेनि जें दिसे । नाहींपणेंचि जें असे । विसरें आठवे तें कैसें । चुकवूं आतां | ज्ञाने.१८.७७.१६१७ |
| ४३८१. असे | आम्हां तंव गमे ऐसें । मा तुझें जोतीष कैसें । ते नेणों संजया असे । तैसें सांग पां | ज्ञाने.१८.७७.१६३० |
| ४३८२. असे | दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु । सुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा | ज्ञाने.१८.७८.१६३४ |
| ४३८३. असे | कृष्ण विजयस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तैं जयो लागेंवेगें । तेथेंचि आहे | ज्ञाने.१८.७८.१६४० |
| ४३८४. असे | विजयी नामें अर्जुन विख्यातु । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथु । श्रियेसीं विजय निश्चितु । तेथेंचि असे | ज्ञाने.१८.७८.१६४१ |
| ४३८५. असे | तैसा देवाचिया शक्ती । पार्थु देवासीचि बहुती । परी माने इये स्तुती । गौरव असे | ज्ञाने.१८.७८.१६५१ |
| ४३८६. असे | तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजहीआंतु । रिघोनियां | ज्ञाने.१८.७८.१७२८ |
| ४३८७. असे | वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणे स्वामीची । ऐसिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे | ज्ञाने.१८.७८.१७६४ |
| ४३८८. असे | त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोशक्षेत्र । जेथ जगाचें जीवसूत्र । श्रीमहालया असे | ज्ञाने.१८.७८.१८०३ |
| ४३८९. असें | तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें । करूनि घेयावें हें तुमतें । विनवितु असें | ज्ञाने.१.८० |
| ४३९०. असें | तरी ये जाणिवेचें कीर सरलें । परी आणीक एक असें जाहलें । जें थितें हें डहुळलें । मानस माझें | ज्ञाने.३.२.१४ |
| ४३९१. असें | मी अत्यंत जड असें । परी ऐसाही निकें परियसें । कृष्णा बोलावें तुवां तैसें । एकनिष्ठ | ज्ञाने.३.२.१८ |
| ४३९२. असें | आतां आणिकाचियां गोठी । तुज सांगों काई किरीटी । देखें मीचि इये राहाटी । वर्तत असें | ज्ञाने.३.२२.१६० |
| ४३९३. असें | पवन कवणातें न शिवेचि । आकाश कें न समायेचि । हें असो एक मीचि । विश्वीं असें | ज्ञाने.७.२५.१६० |
| ४३९४. असें | तेंचि कल्पितें मुदल जाये । तैं असें नाहीं हें कें आहे । म्हणऊनि पुढती तूं पाहें । हा ऐश्वर्ययोगु | ज्ञाने.९.६.९२ |
| ४३९५. असें | तो जैसा कां साक्षिभूतु । गृहव्यापारप्रवृत्तिहेतु । तैसा भूतकर्मीं अनासक्तु । मी भूतीं असें | ज्ञाने.९.९.१२९ |
| ४३९६. असें | मी स्वानंदाभिरामु । तया मज अनेकां सुखांचा कामु । अघवाचि मी असें समु । कीं म्हणती एकदेशी | ज्ञाने.९.११.१६७ |
| ४३९७. असें | तरी जयांचिये चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी । जयां निजेलियातें उपासी । वैराग्य गा | ज्ञाने.९.१३.१८८ |
| ४३९८. असें | मीचि एक अनेकपणें । वेगळालेनि प्रकृतीगुणें । जीत जगाचेनि प्राणें । वर्तत असें | ज्ञाने.९.१८.२८९ |
| ४३९९. असें | ते वर्तत दिसती देहीं । परि ते देहीं ना माझां ठायीं । आणि मी तयांचां हृदयीं । समग्र असें | ज्ञाने.९.२९.४०९ |
| ४४००. असें | आइकें कुटिलालकमस्तका । धनुर्वेदत्र्यंबका । मी आत्मा असें एकैका । भूतमात्राचां ठायीं | ज्ञाने.१०.२०.२१५ |
| ४४०१. असें | त्या दिव्यचक्षूंचेनि पैसें । चहूंकडे जंव पाहत असें । तंव दोर्दंडीं जैसें । आकाश कोंभैलें | ज्ञाने.११.१६.२६६ |

| | | |
|---|---|---|
| ४४०२. असें | परि या तुझिया रूपाआंतु । जी उणीव एक असें देखतु । जे आदि मध्य अंतु । तिन्हीं नाहीं | ज्ञाने.११.१६.२८० |
| ४४०३. असें | परि पडिलिया दुःखसागरीं । तूं काढिसी कां जयापरी । ते कीर्ति तुझी हरी । आठवित असें | ज्ञाने.११.३६.५०२ |
| ४४०४. असें | तयां आघवियांचिआंतु । घरडोळी घेऊनि असें पाहतु । परि ही देखिली ऐकिली मातु । आतुडेचिना | ज्ञाने.११.४५.५८६ |
| ४४०५. असें | यया बोला कांहीं । अनारिसें नाहीं । आपली आण पाहीं । वाहतु असें गा | ज्ञाने.१२.८.१०३ |
| ४४०६. असें | साउली सरिसीच असे । परी असें हें नेणिजे जैसें । स्त्रियेचें तैसें । लोलुप्य नाहीं | ज्ञाने.१३.९.५९५ |
| ४४०७. असें | हें निफजेल आतां आघवें । ऐसें बोलिजेल बरवें । जें अधिष्ठिला असें परमदेवें । निवृत्ती मी | ज्ञाने.१३.३४.११६२ |
| ४४०८. असें | हा ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें । केलें असें श्रीमंतें । श्रीगुरुरायें | ज्ञाने.१३.३४.११६४ |
| ४४०९. असें | आणि आथी नाथी तितुकें । रुंधलें असें येणेंचि एकें । कल्पांतींचेनि उदकें । व्योम जैसें | ज्ञाने.१५.५३ |
| ४४१०. असें | जो एक मी कां समस्तीं । व्यापकु असें भूतजातीं । ऐक तिये व्याप्ती । रूप करूं | ज्ञाने.१५.१०-११.३९७ |
| ४४११. असें | मी रिगालों असें भूतळीं । म्हणौनि समुद्रमहाजळीं । हे पांसूची ढेंपुळी । विरेचिना | ज्ञाने.१५.१३.४०१ |
| ४४१२. असें | तेथूनि फांकती रश्मिकर । ते पाट पेलुनि अपार । सर्वौषधींचे आगर । भरितु असें मी | ज्ञाने.१५.१३.४०४ |
| ४४१३. असें | पैं आघवा मीचि असें । येथ नाहीं कीर अनारिसें । परी प्राणियांचिया उल्लासें । बुद्धी ऐसा | ज्ञाने.१५.१४.४१५ |
| ४४१४. असें | म्हणोनि जैसा असें तैसया । मातें नेणोनि धनंजया । वेदु जाणों गेला तंव तया । जालिया शाखा | ज्ञाने.१५.१५.४३२ |
| ४४१५. असें | मग एकपण ना दुजें । असें नाहीं हें नेणिजे । अनुभव निर्बुजे । बुडाला जेथें | ज्ञाने.१५.१७.५३४ |
| ४४१६. असें | ऐसी इहीं तिहीं लिंगीं । त्रिविध श्रद्धा जगीं । पैं हें ययालागीं । सांगत असें | ज्ञाने.१७.४.८२ |
| ४४१७. असें | परी हें मी करितु असें । ऐसा आठवु त्यजी मानसें । तैसेंचि पाणी दे आशे । फळाचिये | ज्ञाने.१८.९.२०१ |
| ४४१८. असें | तेथ मी जाणत असें । विपायें तूं गा ऐसें । कल्पिसील मानसें । विचक्षणा | ज्ञाने.१७.२२.३०९ |
| ४४१९. असें | मग अज्ञान निमालिया । मीचि येकु असें अपैसया । सनिद्र स्वप्न गेलया । आपणपें जैसें | ज्ञाने.१८.६६.१३९६ |
| ४४२०. असेल | जागणें जरी जाहलें । तरी व्हावें तें मितलें । येतुलेनि धातुसाम्य संचलें । असेल सुखें | ज्ञाने.६.१७.३५१ |
| ४४२१. असेल | तरी सहजें मन कोंडलें । हृदयींचि असेल उगलें । जैसें करचरणीं मोडलें । परिवरु न संडी | ज्ञाने.८.१२.११३ |
| ४४२२. असेल | जंव देह हें असेल । तंव ऐसी वोळगी कीजेल । मग देहांतीं नवल । बुद्धि आहे | ज्ञाने.१३.७.४३० |
| ४४२३. असो | झुंजती कुळकणी जाणती । कळे कीर्तीसी जिती । हे बहु असो क्षात्रनीती । एथोनियां | ज्ञाने.१.९.११३ |
| ४४२४. असो | जयां उपकार होते केले । कां आपदीं जे राखिले । हे असो वडील धाकुले । आदिकरुनी | ज्ञाने.१.२५-२७.१८३ |
| ४४२५. असो | म्हणवूनि कौरव हे वधिजती । मग आम्ही भोग भोगिजती । हे असो मात अघडती । अर्जुन म्हणे | ज्ञाने.१.३७.२३५ |
| ४४२६. असो | निष्कपटा होआवें । उसिणा घाई जुंझावें । हें असो काय सांगावें । प्रत्यक्षावरी | ज्ञाने.२.३१.१९० |
| ४४२७. असो | हे स्वप्नावबोधु ठेले । कीं चरण चालों विसरले । हें असो काय निमाले । जन्ममृत्यु | ज्ञाने.३.५.५७ |
| ४४२८. असो | हें असो प्रस्तुत । सांगिजेल तुज हित । तें अर्जुना देऊनि चित्त । अवधारीं पां | ज्ञाने.३.२७.१८० |

| | | |
|---|---|---|
| ४४२९. असो | हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहली । तरी भोगितां तेचि भली । जियापरी | ज्ञाने.३.३५.२२४ |
| ४४३०. असो | हें असो मोहें मानिजे । यांतें अहंकारें घेपे दीजे । जेणें जग आपुलेनि भोजें । नाचवीत असे | ज्ञाने.३.३७.२४९ |
| ४४३१. असो | एऱ्हवीं जग हें कर्माधीन । ऐसी याची व्याप्ती गहन । परि तें असो आइकें चिन्ह । प्राप्तांचें गा | ज्ञाने.४.१७.९२ |
| ४४३२. असो | एकेचि ठायीं बैसला । परि सर्वत्र तोचि गेला । हें असो विश्व जाहला । आंगेंचि तो | ज्ञाने.४.१८.१०२ |
| ४४३३. असो | हें असो विश्व पाहीं । जयासि आपणपेंवांचूनि नाहीं । आतां कवण तें कर्म कायी । बाधी तयातें | ज्ञाने.४.२१-२२.११२ |
| ४४३४. असो | म्हणोनि असो हें न घडे । तें विचारितांचि असंगडें । पुढती ज्ञानाचेनि पाडें । पवित्र न दिसे | ज्ञाने.४.३८.१७८ |
| ४४३५. असो | ऐसा हा उत्तरोत्तरु । ज्ञानबीजाचा विस्तारु । सांगतां असे अपारु । परि असो आतां | ज्ञाने.४.३९.१९२ |
| ४४३६. असो | हें असो काय म्हणावें । सर्वज्ञु जाणती स्वभावें । तरी निकें चित्त द्यावें । हे विनंति माझी | ज्ञाने.४.४२.२१७ |
| ४४३७. असो | परी मागील असो देवा । आतां प्रस्तुतीं उकलु देखावा । सांगें दोहींमाजि बरवा । मार्गु कवण | ज्ञाने.५.१.६ |
| ४४३८. असो | हें असो काजेंविण । जें जें कांहीं कारण । तें केवळ कर्म जाण । इंद्रियांचें | ज्ञाने.५.११.५९ |
| ४४३९. असो | हा असो अतिप्रसंगु । न संडी पां कथालागु । होईल श्लोकसंगतिभंगु । म्हणऊनियां | ज्ञाने.५.११.६६ |
| ४४४०. असो | हें असो संतापु कैसा । चंद्रु न स्मरे जैसा । भूतीं भेद नेणती तैसा । ज्ञानिये ते | ज्ञाने.५.१७.९२ |
| ४४४१. असो | ना तरी हे धेनु हें श्वान । एक गुरु एक हीन । हें असो कैचें स्वप्न । जागतया | ज्ञाने.५.१८.९४ |
| ४४४२. असो | हें असो पवनाचेनि मेळें । जैसें जळींचि जळ लोळे । तें आणिकें म्हणती वेगळे । कल्लोळ हे | ज्ञाने.५.१९.१०० |
| ४४४३. असो | हे असो आघवी बोली । सांग पां सर्पफणीची साउली । ते शीतल होईल केतुली । मूषकासी | ज्ञाने.५.२२.११७ |
| ४४४४. असो | म्हणोनि असो हें आघवें । एथ न बोलणें काय बोलावें । ते खुणचि पावेल स्वभावें । आत्माराम | ज्ञाने.५.२४-२५.१३६ |
| ४४४५. असो | ते सत्त्वाचे सात्त्विक । कीं चैतन्याचे आंगिक । हें बहु असो एकैक । वानिसी काई | ज्ञाने.५.२४-२५.१४० |
| ४४४६. असो | ते म्हणों कारुण्यरसाची वृष्टि । कीं नवया स्नेहाची सृष्टि । हें असो नेणिजे दृष्टी । हरीची वानूं | ज्ञाने.५.२९.१७१ |
| ४४४७. असो | परी तें असो आतां आघवें । नलगे श्रोतयांतें कडसावें । जे एथ अधिकारिये स्वभावें । निष्कामकाम | ज्ञाने.६.२७ |
| ४४४८. असो | विपायें जरी आठवलें चित्ता । तरी दे आपुली योग्यता । हें असो तयातें प्रशंसितां । लाभु आथि | ज्ञाने.६.९.१०४ |
| ४४४९. असो | म्हणोनि असो हें वानणें । सांगों नेणों कवणाचीं लक्षणें । दावावीं मिषें येणें । कां बोलिलों तें | ज्ञाने.६.१०.११२ |
| ४४५०. असो | हें असो वयसेचिये शेवटीं । जैसें एकचि विये वांझोटी । मग ते मोहाची त्रिपुटी । नाचों लागे | ज्ञाने.६.१०.१२१ |
| ४४५१. असो | हें असो कथा सांगें वेगीं । मग अर्जुन म्हणे सलगी । देवा इयें संतचिन्हें हन आंगीं । न ठकती माझां | ज्ञाने.६.१०.१३९ |
| ४४५२. असो | म्हणोनि तैसें न करावें । समभावें धरावें । हें बहु असो होआवें । आसन ऐसें | ज्ञाने.६.११.१८५ |
| ४४५३. असो | हें असो ते कुंडली । हृदयाआंतु आली । तंव अनाहताचां बोलीं । चावळे ते | ज्ञाने.६.१४.२७४ |
| ४४५४. असो | पुढती जाणणें तें नाहींचि । म्हणोनि असो किती हेंचि । बोलावें आतां वायांचि । धनुर्धरा | ज्ञाने.६.१५.३१८ |
| ४४५५. असो | म्हणोनि असो तें विशेषें । आपणपयासारिखें । जो चराचर देखे । अखंडित | ज्ञाने.६.३२.४०४ |

| | | |
|---|---|---|
| ४४५६. असो | म्हणऊनि येणें मुखें जें निगे । तें संतांचां हृदयीं साचचि लागे । हें असो सांगें श्रीरंगें । बोलिलें जें | ज्ञाने.६.४७.४९३ |
| ४४५७. असो | हें रूपक परी असो । सांगों उघड जैसें परियेसों । तरी नामरूपाचा अतिसो । प्रकृतीच कीजे | ज्ञाने.७.६.२७ |
| ४४५८. असो | हें असो डोळ्यांचें । डोळांचि पडळ रचे । तेणें देखणेंपण डोळ्यांचें । न गिळिजे कायि | ज्ञाने.७.१३.६२ |
| ४४५९. असो | हें असो मग म्हणितलें । जे कां तुज सांगितलें । तेही भक्त भले । पढियंते आम्हां | ज्ञाने.७.१८.१२३ |
| ४४६०. असो | हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं । जैसें सबाह्य जळ डोहीं । बुडालिया घटा | ज्ञाने.७.१९.१३३ |
| ४४६१. असो | म्हणोनि असो हें यापरी । तो देखे ज्ञानाची वाखारी । तेणें संसरलेनि करी । आपु विश्व | ज्ञाने.७.१९.१३५ |
| ४४६२. असो | हें असो परौतें । मग हो कां आवडे तें । परि यजी जो देवतांतें । तो देवत्वासीचि ये | ज्ञाने.७.२३.१४९ |
| ४४६३. असो | पवन कवणातें न शिवेचि । आकाश कें न समायेचि । हें असो एक मीचि । विश्वीं असें | ज्ञाने.७.२५.१६० |
| ४४६४. असो | म्हणोनि कृपाळुवा गुरूचिया ठायीं । हें नवल नोहे कांहीं । परि तें असो आइका काई । जें देवो बोलता झाला | ज्ञाने.८.२.१४ |
| ४४६५. असो | मग तया गोळकांचे अंशांश । प्रसवती आदिसंकल्प असमसहास । हें असो ऐसी बहुवस । सृष्टि वाढे | ज्ञाने.८.३.२४ |
| ४४६६. असो | तेविं सदभ्यासें निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर । लावीं मग शरीर । असो अथवा जावो | ज्ञाने.८.८.८२ |
| ४४६७. असो | जें वैरियाचा पाहुणेरु । जें दुर्जनाचा आदरु । हें असो जें सागरु । अनर्थाचा | ज्ञाने.८.१४-१५.१४९ |
| ४४६८. असो | आतां असो हें सकळ । जाण पां ज्ञानासि अग्नि मूळ । तया अग्नीचें प्रयाणीं बळ । संपूर्ण आथी | ज्ञाने.८.२३.२१९ |
| ४४६९. असो | तरी आतां देह असो अथवा जावो । आम्ही तों केवळ वस्तूचि आहों । कां जे दोरीं सर्पत्व वावो । दोराचिकडुनी | ज्ञाने.८.२७.२४८ |
| ४४७०. असो | मग भलतेथ भलतेव्हां । देहबंधु असो अथवा जावा । परि अबंधा नित्य ब्रह्मभावा । बिघड नाहीं | ज्ञाने.८.२७.२५७ |
| ४४७१. असो | हें असो शब्दब्रह्म जिये बाजे । शब्द मावळलेया निवांतु निजे । तो गीतार्थु मऱ्हाटिया बोलिजे । हा पाडु काई | ज्ञाने.९.२२ |
| ४४७२. असो | म्हणऊनि बोलिलिया बोलाचा अतिसो । न कीजे यालागीं हें असो । तरी मजआंत पैसो । दिठी तुझी | ज्ञाने.९.४.७० |
| ४४७३. असो | हें असो आंगीं भरलिया भवंडी । जैशा भोंवत दिसती अरडीदरडी । तैशी आपुलिया कल्पना अखंडीं । गमती भूतें | ज्ञाने.९.५.८१ |
| ४४७४. असो | हा प्रकृतीविखो आघवा । तुवां मागां परिसिलासे पांडवा । म्हणोनि असो काइ सांगावा । पुढतपुढती | ज्ञाने.९.७.९९ |
| ४४७५. असो | स्थावरा आणि जंगमा । स्थूळा अथवा सूक्ष्मा । हे असो भूतग्रामा । प्रकृतिचि मूळ | ज्ञाने.९.८.१२१ |
| ४४७६. असो | हें असो पर्वताचिये हृदयींचें । जेविं पर्जन्यधारास्तव न खोंचे । तेविं कर्मजात प्रकृतीचें । न लगे मज | ज्ञाने.९.९.१२६ |
| ४४७७. असो | एवं तमाचिये पडिले गर्ते । न पविजतीचि विचाराचेनि हातें । हें असो ते गेले जेथें । ते शुद्धीचि नाहीं | ज्ञाने.९.१२.१८५ |
| ४४७८. असो | हें बहु असो यापरी । कीर्तित मातें अवधारीं । एक विचरती चराचरीं । पांडुकुमरा | ज्ञाने.९.१४.२११ |
| ४४७९. असो | परि तें असो येणें उचितें । ज्ञानयज्ञें यजितसांते । उपासिती मातें । ते सांगितले | ज्ञाने.९.१५.२६३ |
| ४४८०. असो | परि हें असो आतां प्रस्तुत । ऐकें यापरी ते दीक्षित । यजुनि मातें याचित । स्वर्गभोगु | ज्ञाने.९.२०.३१८ |
| ४४८१. असो | हें बहु असो जे ऐसे । भोग इंद्रसुखाहिसरिसे । ते भोगिजती जंव असे । पुण्यलेशु | ज्ञाने.९.२०.३२७ |
| ४४८२. असो | हें असो कायसीं फुलें । पानचि एक आवडे तें जाहलें । तें साजुकही न हो सुकलें । भलतैसें | ज्ञाने.९.२६.३८५ |

| | | |
|---|---|---|
| ४४८३. असो | हें असो बहुत पार्था । तो उतरला कर्में सर्वथा । जयाची अखंड गा आस्था । मजचिलागीं | ज्ञाने.९.३०.४२३ |
| ४४८४. असो | हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकरु माथां पारुखे । तो जीवचि परि तुके । महेशेंशीं | ज्ञाने.१०.९ |
| ४४८५. असो | परि हें असो एथ ऐसें । रामरावण झुंजिन्नले कैसें । रामरावण जैसे । मीनले समरीं | ज्ञाने.१०.३८ |
| ४४८६. असो | आतां असो हे विकडी । मज उघड तुझी आवडी । म्हणोनि तृप्तीची सवडी । बोलतां न पडे | ज्ञाने.१०.१.६० |
| ४४८७. असो | आम्हां येतुलियाचि कारणें । तेंचि तें तुजशीं बोलणें । परि असो हें अंतःकरणें । अवधान दे | ज्ञाने.१०.१.६१ |
| ४४८८. असो | तैसें गुरु जी सर्वत्र आथी । परि कृष्णा आम्हां तूंचि गती । हें असो मजप्रती । विभुती सांगें | ज्ञाने.१०.१५.१८४ |
| ४४८९. असो | परि प्रस्तुत ऐसें असो । हें करवी आवडीचा अतिसो । मग म्हणे आइकें सांगतसों । धनुर्धरा | ज्ञाने.१०.१९.२०८ |
| ४४९०. असो | ऐसिया व्यापका मातें जैं जाणावें । तैं विभूतिभेंदें काय करावें । परि हे तुझी योग्यता नव्हे । म्हणोनि असो | ज्ञाने.१०.३२-३३.२६५ |
| ४४९१. असो | अगा ज्ञानियांचां ठायीं । ज्ञान तें मी पाहीं । आतां असो हें ययां कांहीं । पार न देखों | ज्ञाने.१०.३८.२९९ |
| ४४९२. असो | आणि सिनाना विभूती । मज अपारातें मविसील किती । म्हणोनि किंबहुना सुभद्रापती । असो हें जाणणें | ज्ञाने.१०.४२.३१६ |
| ४४९३. असो | परि असो हें तो अर्जुनु । स्वहिताचा वाढवितसे मानु । कीं याहीवरी तया आनु । धिंवसा उपनला | ज्ञाने.१०.४२.३३० |
| ४४९४. असो | हें असो ऐसे सावयव । जेथ सासिन्नले आथी रसभाव । जे श्रवणसुखाची राणीव । जोडली जगा | ज्ञाने.११.११ |
| ४४९५. असो | तरि हेंही असो । सांडीं माझा अतिसो । परि संयतिसीं वसो । बुद्धि तुझी | ज्ञाने.१२.११.१२७ |
| ४४९६. असो | आतां असो हें किरीटी । पैं प्रियाचिया गोष्टी । दुणा थांव उठी । आवडी गा | ज्ञाने.१२.१४.१६० |
| ४४९७. असो | तरि तयाचा गा मज मोहो । काय सांगों तो पढियावो । हें असो जीवें जीवो । माझेनि तो | ज्ञाने.१२.१५.१७० |
| ४४९८. असो | म्हणोनि असो जो ऐसा । शुचित्वें तीर्था कुवासा । जेणें लंघविले दिशा । मनोमळ | ज्ञाने.१२.१६.१७८ |
| ४४९९. असो | परि हें असो आतां । महेशातें वानितां । आत्मस्तुति होता । संचारु असे | ज्ञाने.१२.१९.२१७ |
| ४५००. असो | हें असो स्वर्ग पाताळ । कीं भूमी दिशा अंतराळ । हे विवक्षा ठेली सकळ । मूर्तिमय देखतसें | ज्ञाने.११.१६.२७१ |
| ४५०१. असो | हें असो काळें अवंतिलें रण । कां सर्वसंहारें मातलें मरण । तैसें अतिभिंगुळवाणेंपण । वदनीं तुझिये | ज्ञाने.११.२३.३४६ |
| ४५०२. असो | तंव माझेनि नामें धैर्य हारपलें । कीं तयाहीवरी विश्वरूपदर्शन जाहलें । हें असो परि मज भलें आतुडविलें । उपदेशासी | ज्ञाने.११.२४.३७२ |
| ४५०३. असो | असो दांतदाढांची दाटी । न झांकवे मा दोंदों वोठीं । सैंघ प्रळयशस्त्रांचिया दाट कांटी । लागलिया जैशा | ज्ञाने.११.२५.३७६ |
| ४५०४. असो | जी काय एक तूं नव्हसी । तूं कवणे ठायीं गा नससी । हें असो जैसा आहासी । तैसिया नमो | ज्ञाने.११.३९-४०.५१९ |
| ४५०५. असो | परि हे असो नव्हे । तुम्ही या न लगावें । आतांचि हें आघवें । सांगिजेल | ज्ञाने.१३.४.५३ |
| ४५०६. असो | एकाचेनि मतें । देह म्हणती ययातें । परि असो हें अनंतें । नामें यया | ज्ञाने.१३.५-६.१५७ |
| ४५०७. असो | हें असो या चिन्हांचा । नटनाचु ठायीं जयाचां । जाण ज्ञान तयाचिया । हाता चढलें | ज्ञाने.१३.७.२१५ |
| ४५०८. असो | आतां असो हें वाग्जाळ । जाणें तें करतळ । सज्जनाचें शीळ । स्वभाव जैसें | ज्ञाने.१३.७.२९१ |
| ४५०९. असो | हें बहु असो पंडितु । धरूनि बाळकाचा हातु । वोळी लिही व्यक्तु । आपणचि | ज्ञाने.१३.७.३०७ |

| | | |
|---|---|---|
| ४५१०. असो | तो जाण वेल्हाळ । ज्ञानाचें वेळाउळ । हें असो निखळ । ज्ञानचि तो | ज्ञाने.१३.७.३११ |
| ४५११. असो | आपुलिया गुणांचीं लेणीं । करीन गुरुसेवे स्वामिणी । हें असो होईन गंवसणी । मीचि भक्ती | ज्ञाने.१३.७.४१२ |
| ४५१२. असो | हें असो सांगों किती । नाहीं पारु गुरुभक्ती । परी गा उत्क्रांतमती । कारण हें | ज्ञाने.१३.७.४५१ |
| ४५१३. असो | तो तत्त्वज्ञानाचा ठावो । ज्ञाना तेणेंचि आवो । हें असो तो देवो । ज्ञान भक्तु | ज्ञाने.१३.७.४५३ |
| ४५१४. असो | तैसी ज्ञानीं मती न फंके । येर जल्पती नेणों केतुकें । परि तें असो निकें । केलें तुवां | ज्ञाने.१३.११.६३८ |
| ४५१५. असो | तंव श्रोतां म्हणितलें असो । न सांगतियाचा अतिसो । ग्रंथोक्ती तेथ आडसो । घालिसी कां | ज्ञाने.१३.११.६३३ |
| ४५१६. असो | पूर्णचंद्रेंसी राती । युग एक असो न पाहती । तरि काय पाहत आहाती । चकोरें ते | ज्ञाने.१३.११.६४१ |
| ४५१७. असो | असो हें आइक । अज्ञानचिन्हें आणिक । जेणें तुज सम्यक् । जाणवें तें | ज्ञाने.१३.११.७८० |
| ४५१८. असो | तो अज्ञानासी मूळ । अज्ञाना तेणें बळ । हें असो केवळ । तो तेंचि रूप | ज्ञाने.१३.११.८०३ |
| ४५१९. असो | म्हणौनि असो हें न बोलों । परि साविया गा तोषलों । जे ज्ञानतरिये मेळविलों । श्रवणसुखाचिये | ज्ञाने.१३.११.८५७ |
| ४५२०. असो | जें वायूचा श्वासोश्वासु । जें गगनाचा अवकाशु । हें असो आघवाचि आभासु । आभासे जेणें | ज्ञाने.१३.१७.९३३ |
| ४५२१. असो | अर्जुना जिये ठायीं । न सरे द्वैताची वही । हें असो जें हृदयीं । सर्वांचां असे | ज्ञाने.१३.१७.९३८ |
| ४५२२. असो | जे उत्पत्ति प्रलयो होत । ते इयेचे सायंप्रात । हें असो अद्भुत । मोहन हे | ज्ञाने.१३.२१.९९५ |
| ४५२३. असो | यालागीं स्वरूपें । उणा पुरा न घेपे । हें असो तो न लिंपे । देहीं देहा | ज्ञाने.१३.३१.१११८ |
| ४५२४. असो | हें आघवेंचि असो एकु । गगनौनि जैसा अर्कु । प्रगटवी लोकु । नांवें नांवें | ज्ञाने.१३.३३.११२६ |
| ४५२५. असो | परि असो तें नाथिलें । न पुसतां कां मी बोलें । किंबहुना दिधलें । सर्वस्व देवें | ज्ञाने.१३.३४.११४६ |
| ४५२६. असो | किंबहुना माया असोस । ज्ञान जी तुझेनि डोळस । असो वानणें सायास । श्रुतीसि हें | ज्ञाने.१४.१० |
| ४५२७. असो | हें असो आतां वांजटा । तो ज्ञानार्थ करूनि गोमटा । ग्रंथु दावीं उत्कंठा । भंगों नेदीं | ज्ञाने.१४.२६ |
| ४५२८. असो | वेदांतीं यातें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञराया । असो किती बोलों वायां । अज्ञान हें | ज्ञाने.१४.३.७० |
| ४५२९. असो | आतां असो हे बहु बोली । ऐसें विश्व माया व्याली । तेथ जांघु जाली । माझी सत्ता | ज्ञाने.१४.३.११५ |
| ४५३०. असो | अविवेकमहामंत्र । जें मौढ्यमद्याचें पात्र । हें असो मोहनास्त्र । जीवांसि जें | ज्ञाने.१४.८.१७६ |
| ४५३१. असो | परी हे वाहणी असो । तरी आन न दिसो । परिसें तें सांगतसों । मागील गोठी | ज्ञाने.१४.१९.२७९ |
| ४५३२. असो | परि हें असो आतां । प्रेम रुळतसे बोलतां । कें गुरुगौरव वर्णितां । उन्मेष असे | ज्ञाने.१५.२७ |
| ४५३३. असो | ऐसी यया वेदांतीं । निरूपणभाषाप्रतीती । परी तें असो प्रस्तुतीं । अज्ञान मूळ | ज्ञाने.१५.१.९० |
| ४५३४. असो | परी तें असो हें ऐसें । कावरें झाड उससे । यया महदादि आरवसें । अधोशाखा | ज्ञाने.१५.१.१०९ |
| ४५३५. असो | एऱ्हवीं पिंपळु घडतां विखीं । मियां गति देखिली असे निकी । परी तें असो काय लौकिकीं । हेतु काज | ज्ञाने.१५.१.११६ |
| ४५३६. असो | हें बहु असो झडती । आंधारें भोवंडितां कोलती । ते दिसे जैसी आयती । चक्राकार | ज्ञाने.१५.१.१३७ |

| | | |
|---|---|---|
| ४५३७. असो | असो बहु हें बोलणें । वानिजेल तो कवणें । जो भवरुखु जाणे । उखि ऐसा | ज्ञाने.१५.१.१४३ |
| ४५३८. असो | परी हें असो ऐसें । ब्रह्मादिक ते आंगवसें । ऊर्ध्वमुळासरिसें । न तुकती गा | ज्ञाने.१५.२.२०४ |
| ४५३९. असो | ना ना मावळतेनि तपनें । नेइजती लोकांचीं दर्शनें । हें असो द्रुती पवनें । नेईजे जैसी | ज्ञाने.१५.८.३६६ |
| ४५४०. असो | हें असो स्वातीचें उदक । शुक्तीं मोतीं व्याळीं विख । तैसा सज्ञानांसी मी सुख । दु:ख तों अज्ञानासी | ज्ञाने.१५.१४.४२० |
| ४५४१. असो | परी ते तंव गोठी असो । आधीं दोहींची हे परियेसो । संसारग्रामा वसों । आले असती | ज्ञाने.१५.१६.४७४ |
| ४५४२. असो | अगा काढूनि भ्रांतीचें दांग । उभवी सृष्टीचें आंग । हें असो बहु जग । जया नाम | ज्ञाने.१५.१६.४८३ |
| ४५४३. असो | हें असो अधोशाखा । या संसाररूपा रुखा । मूळ तें पुरुषा । अक्षराचें | ज्ञाने.१५.१६.५१९ |
| ४५४४. असो | हें असो जलतरंगा । नाहीं सिनानेपण जेवीं गा । तेवीं दिसता प्रकाशु जगा । आपणचि जो | ज्ञाने.१५.१७.५५२ |
| ४५४५. असो | परी हें असो ऐसिया । मज पुरुषोत्तमातें धनंजया । जाणे जो पाहलेया । ज्ञानमित्रें | ज्ञाने.१५.१९.५५८ |
| ४५४६. असो | परी हें असो आतां प्रस्तुतीं । ज्ञानाचां हिताहितीं । समर्था संपत्ती । इयाचि दोन्ही | ज्ञाने.१६.६४ |
| ४५४७. असो | कां सुकुळीनें आपुली । आत्मजा सत्कुळींचि दिधली । हें असो लक्ष्मी स्थिरावली । मुकुंदीं जैसी | ज्ञाने.१६.१.८३ |
| ४५४८. असो | तया नांव जाण दान । जें मोक्षनिधानाचें अंजन । हें असो ऐक चिन्ह । दमाचें तें | ज्ञाने.१६.१.८८ |
| ४५४९. असो | हें बहु असो आरिसा । आपणपें देखावया जैसा । पुढतपुढती बहुवसा । उटिजे प्रीती | ज्ञाने.१६.१.१०२ |
| ४५५०. असो | हें असो महासिद्धीसी । लक्ष्मीही आलिया पाशीं । परी महाविष्णु जैसी । गणीचिना ते | ज्ञाने.१६.२.१६५ |
| ४५५१. असो | हें बहु असो देहपणें । नांवारूपासि येणें । नाहीं लाजिरवाणें । याहूनि | ज्ञाने.१६.२.१८१ |
| ४५५२. असो | हें असो तयाचां ठायीं । मिळोनि साही दोषीं इहीं । आसुरी संपत्ति पाहीं । वाढविजे | ज्ञाने.१६.४.२६३ |
| ४५५३. असो | आतां असो हें किडाळ । बोली न करूं पघळ । सांगतांचि सफोल । होतसे वाचा | ज्ञाने.१६.८.३१३ |
| ४५५४. असो | हें असो आपुला ठेवा । हाता आथी जरी यावा । तरी आदरें जेवीं दिवा । पुढां कीजे | ज्ञाने.१६.२४.४५८ |
| ४५५५. असो | हें असो विस्मो दातारा । तूं होसी जयाचा सोयरा । सोइरिकेचिया व्यवहारा । मुकेचि तो | ज्ञाने.१७.९ |
| ४५५६. असो | हें असो जो तळें करी । तें तयाचीच तृषा हरी । कीं सुआरासीचि अन्न घरीं । येरां नोहे | ज्ञाने.१७.४.९० |
| ४५५७. असो | प्रेत बाहिरें घालिजे । कां अंत्यजु संभाषणीं त्यजिजे । हें असो हातें क्षाळिजे । कश्मलातें | ज्ञाने.१७.६.१०७ |
| ४५५८. असो | आणि सुखाचें घेणें देणें । निकें उवाया ये येणें । हें असो वाढे साजणें । आनंदेसीं | ज्ञाने.१७.८.१३६ |
| ४५५९. असो | हें असो उगें आगीतें । म्हणे तैसें राइतें । पढियें प्राणापरौतें । राजसासि गा | ज्ञाने.१७.९.१४७ |
| ४५६०. असो | परी तें असो हें जाण । मानस तपाचें लक्षण । देवो म्हणे संपूर्ण । सांगितलें | ज्ञाने.१७.१६.२३७ |
| ४५६१. असो | हें असो धनमानीं आस । वाढउनी तप कीजे सायास । तैं तेंचि तप राजस । बोलिजे गा | ज्ञाने.१७.१८.२४७ |
| ४५६२. असो | आलिया न घली बैसों । तेथ गंधाक्षतांचा काय अतिसो । हा अप्रसंगु कीर असो । तामसीं नरीं | ज्ञाने.१७.२२.३०४ |
| ४५६३. असो | हें बहु असो यापरी । मोल वेंचणें जें अवधारीं । तया नांव चराचरीं । तामस दान | ज्ञाने.१७.२२.३०७ |

| | | |
|---|---|---|
| ४५६४. असो | हेंही असो प्रजापती । शक्ति जे सृष्टिकरिती । ते जया एका आवृत्ती । नामाचिये | ज्ञाने.१७.२३.३३५ |
| ४५६५. असो | परी हें असो ऐसिया । या यज्ञदानादि क्रिया । ओंकारें सावायिलिया । प्रवर्तती | ज्ञाने.१७.२४.३६७ |
| ४५६६. असो | पैं असाधुकर्मा तैसा । सच्छब्दुप्रयोग वीरेशा । हें असो गौरवुचि ऐसा । नामाचा यया | ज्ञाने.१७.२६.३९९ |
| ४५६७. असो | म्हणौनि ब्रह्मनामश्रद्धा । सांडूनि कीजे जो धांदा । हें असो सिणु नुसधा । दृष्टादृष्टीं तो | ज्ञाने.१७.२८.४२२ |
| ४५६८. असो | परी हें असो ऐसें । अर्जुनें पुसिजत असे । म्हणे विनंती विश्वेशें । अवधारिजो | ज्ञाने.१८.८६ |
| ४५६९. असो | परी हें असो पुढती । तोचि त्यागी त्रिजगतीं । जेणें फळत्यागें निष्कृती । नेलें कर्म | ज्ञाने.१८.११.२३२ |
| ४५७०. असो | एथ एकमेकांचिये खुणे । विसंवादु तंवचि जिणें । म्हणोनि असो हें बोलणें । इयेविषयींचें | ज्ञाने.१८.१३.२९५ |
| ४५७१. असो | हेंही असो लोकांचिया । राहाटी होतां आघविया । कोण काम सवितया । आंगा आलें | ज्ञाने.१८.१३.३१२ |
| ४५७२. असो | हें असो परतोनि मागुतें । प्रतिबिंब पाहे बिंबातें । तंव पाहणें जाउनी आयितें । बिंबचि होय | ज्ञाने.१८.१६.३९९ |
| ४५७३. असो | हें असो इहीं इंद्रियीं राहटे । जें सुखदु:खेंसीं जीवा भेटे । तें सुषुप्तिकाळीं वोहटे । जेथ ज्ञान | ज्ञाने.१८.१८.४६५ |
| ४५७४. असो | नाना प्रभा व्यापे प्रकाशु । गोडिया इक्षुरसु । हें असो अवकाशु । आकाशीं जैसा | ज्ञाने.१८.१८.५०९ |
| ४५७५. असो | यालागीं पुढती । आत्मा वेगळाचि सुमती । आतां असो हे किती । जाणतासि तूं | ज्ञाने.१८.१८.५१६ |
| ४५७६. असो | पुढतीं तेंचि सात्त्विक ज्ञान । जे मोक्षलक्ष्मीचें भुवन । हें असो ऐक चिन्ह । राजसाचें | ज्ञाने.१८.२०.५३७ |
| ४५७७. असो | हें असो किती बोलावें । तरी ऐसें जें देखावें । तें ज्ञान नोहे जाणावें । डोळस तम | ज्ञाने.१८.२२.५८१ |
| ४५७८. असो | हें असो परमाणूचेनि लाभें । पाताळ लंघिती वोळंबे । तैसें स्वर्गसुखलोभें । विचंबणें जें | ज्ञाने.१८.२४.६०९ |
| ४५७९. असो | हें असो पावो उचलिला । मदमुख न ठेविती खालां । गाजौनि पुढां जाला । सिंहु जरी | ज्ञाने.१८.३३.७३६ |
| ४५८०. असो | हें असो दीपाचिये सिद्धी । अवघड धू आधीं । नातरी तो औषधीं । जिभेचा ठावो | ज्ञाने.१८.३७.७८० |
| ४५८१. असो | परी हें बहु असो देख । शौर्यादि गुणात्मक । कर्म गा नैसर्गिक । क्षत्रजातीसी | ज्ञाने.१८.४३.८७८ |
| ४५८२. असो | हें असो विषयजातीं । बुद्धी पोळली ऐसी माघौती । पाउलें घेऊनि एकांतीं । हृदयाचां रिगे | ज्ञाने.१८.४९.९५९ |
| ४५८३. असो | हेंही असो चेइलया । तें स्वप्न नाहीं जालिया । मग आपणचि आपणयां । उरिजे जैसें | ज्ञाने.१८.५४.१११० |
| ४५८४. असो | हें असो दर्पणु नेलिया । तो मुखबोधुही गेलिया । देखलेपण एकलेया । आस्वादिजे जेवीं | ज्ञाने.१८.५५.११४१ |
| ४५८५. असो | हें असो क्रमयोगबोधें । तेणें भक्तचित्तें गांगें । मी स्वानंदोदधी वेगें । ठाकिला कीं गा | ज्ञाने.१८.५५.१२२२ |
| ४५८६. असो | हें असो येणें शास्त्रेश्वरें । मागां उपाय बहुवें विस्तारें । सांगितला जैसा करें । घेवों ये आत्मा | ज्ञाने.१८.५५.१२३६ |
| ४५८७. असो | असो रूपक हें तो ईश्वरु । सकल भूतांचा अहंकारु । पांघरोनि निरंतरु । उल्हासत असे | ज्ञाने.१८.६१.१३०२ |
| ४५८८. असो | आशा जैसी दु:खातें । व्याली निंदा दुरितें । हें असो जैसें दैन्यातें । दुर्भगत्व | ज्ञाने.१८.६६.१३९० |
| ४५८९. असो | हें असो काष्ठापासोनी । मथूनि घेतलिया वन्ही । मग काष्ठेंही कोंडोनि । न ठके जैसा | ज्ञाने.१८.६६.१४०८ |
| ४५९०. असो | हें असो कांडत्रयात्मक । श्रुति मोक्षरूप फळ येक । बोभाये जें आवश्यक । ठाकावें म्हणौनि | ज्ञाने.१८.६६.१४५१ |

| | | |
|---|---|---|
| ४५९१. असो | हें असो मग तेणें । सद्गुरुश्रीकृष्णें । पार्थाचें मिसळणें । आणिलें द्वैता | ज्ञाने.१८.६६.१४७३ |
| ४५९२. असो | निपजे दिव्यान्न चोखट । परी माजीं असे काळकूट । हें असो मैत्री कपट- । गर्भिणी जैसी | ज्ञाने.१८.६७.१५०३ |
| ४५९३. असो | याकारणें हें असो । परी जयालागीं शास्त्रातिसो । केला तें तंव तुज पुसों । काज तुझें | ज्ञाने.१८.७१.१५३९ |
| ४५९४. असो | भाग्य तेथ विलासु । सुख तेथें उल्लासु । हें असो तेथ प्रकाशु । सूर्य जेथें | ज्ञाने.१८.७८.१६३७ |
| ४५९५. असो | वेद जेणें सुभाष । सुख जेणें सोल्लास । हें असो रूपस । विश्व जेणें | ज्ञाने.१८.७८.१७२७ |
| ४५९६. असों | हां हो नेणों कवणाची काहाणी । आइकोनि श्लाघत असों अंत:करणीं । ऐसी जाहालेपणाची शिरयाणी । कायसी देवा | ज्ञाने.६.१०.१४२ |
| ४५९७. असों | हें कहीं नव्हतें देखिलें । म्हणोनि भय जें तुज उपजलें । तें सांडीं एथ संचलें । असों दे प्रेम | ज्ञाने.११.४९.६३८ |
| ४५९८. असों | किंबहुना तयापासीं । अज्ञान आहे वाढीसी । हें निकरें गा तुजसीं । बोलत असों | ज्ञाने.१३.११.७२६ |
| ४५९९. असों | म्हणोनि तो दैवागळा । वानीत असों वेळोवेळां । जे साम्यसेजे डोळा । लागला तया | ज्ञाने.१३.२८.१०७८ |
| ४६००. असों | तेवींचि संजयो म्हणे चित्तीं । हा अतिशयो या नृपती । खुपेल म्हणौनि किती । बोलत असों | ज्ञाने.१७.२८.४३१ |
| ४६०१. असों | तरी तयांचिया समवाया- । अनुरूप धनंजया । न करितां उगलिया । नयेल असों | ज्ञाने.१८.६०.१२९० |
| ४६०२. असों | मग उठोनि म्हणे नृपा । श्रीहरीचिया विश्वरूपा । देखिलया उगा कां पां । असों लाहासी | ज्ञाने.१८.७७.१६१६ |
| ४६०३. असोतु | हें असोतु या बोलाचीं ताटें भलीं । वरी कैवल्यरसें वोगरलीं । ही प्रतिपत्ति मियां केली । निष्कामासी | ज्ञाने.६.२२ |
| ४६०४. असोतु | म्हणोनि असोतु इयें वायाणीं । कायशीं मूर्खाची बोलणीं । वायां वाढवितां वाणी । शिणेल हन | ज्ञाने.९.१२.१८६ |
| ४६०५. असोनि | ते वेळीं प्राणासीचि प्राणु नाहीं । तेथ बुद्धि असोनि करील काई । म्हणोनि अग्नीविण देहीं । चेतना न थरे | ज्ञाने.८.२३.२१४ |
| ४६०६. असोनि | तैसा चळणवळणात्मकीं । असोनि ये पांचभौतिकीं । भूतोर्मी एकी । चळिजेना | ज्ञाने.१३.७.४९० |
| ४६०७. असोनि | ऐसा असोनि इये शरीरीं । कोण नित्यबुद्धीची सुरी । अनित्यभावाचां उदरीं । दाटीचिना | ज्ञाने.१३.२८.१०७० |
| ४६०८. असोनि | तरी कर्मीं असोनि कर्मे । जो नावरे समेंविषमें । चर्मचक्षूंचेनि चामें । दृष्टि जैसी | ज्ञाने.१८.१६.४०१ |
| ४६०९. असोनि | जे असोनि त्रिशंकुदोषें । धातयाही आणावें वोसें । तें नासतें कीजे कीं ऐसें । निर्मावें नाहीं | ज्ञाने.१८.७८.१७८७ |
| ४६१०. असोनी | नित्यता ऐसेचि असोनी । ना तरी निश्चित क्षया जाउनि । हे भ्रांति वेगळी करूनी । दोन्हीं नाहीं | ज्ञाने.२.१२.१०४ |
| ४६११. असोस | किंबहुना माया असोस । ज्ञान जी तुझेनि डोळस । असो वानणें सायास । श्रुतीसि हें | ज्ञाने.१४.१० |
| ४६१२. असोस | तैसें अंतर असोस । होय स्फूर्तिहीन उद्वस । विचाराची भाष । हारपे तैं | ज्ञाने.१४.११-१५.२४६ |
| ४६१३. असोस | कामक्रोधलोभांची कास । न सोडीच पाळिली भाष । स्वैराचाराचें असोस । वळघला रान | ज्ञाने.१६.२३.४४८ |
| ४६१४. असोसें | मोराचां आंगीं असोसें । पिसें आहाति डोळसें । परी एकली दिठी नसे । तैसें तें गा | ज्ञाने.१३.११.८३५ |
| ४६१५. असोसें | आणि ऊर्ध्वमूळ ऐसें । निगदिलें कीर असे । परी अधींही असोसें । मूळें यया | ज्ञाने.१५.५७ |
| ४६१६. असोसें | आणि रसाचें आंगवसें । वाढतां वेगें बहुवसें । जिव्हे आर्तीची असोसें । निघती बेंचें | ज्ञाने.१५.१.१०३ |
| ४६१७. असोसें | काय बहु सांगों ऐसे । ते आसुरीप्रकृतीपिसें । तुरंबिती असोसें । गगनौळें तियें | ज्ञाने.१६.१५.३६३ |

| | | |
|---|---|---|
| ५१३०१. थोर | पृथ्वी निवऊनि सागर । भरीजती येवढें थोर । वर्षे तेथ मिषांतर । चातकु कीं | ज्ञाने.१८.६५.१३७७ |
| ५१३०२. थोर | तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें । संसारायेवढें थोर ओझें । फेडिलें जगाचें | ज्ञाने.१८.६६.१४७० |
| ५१३०३. थोरपण | म्हणोनि थोरपण पऱ्हांचि सांडिजे । व्युत्पत्ति आघवी विसरिजे । जैं जगा धाकुटें होइजे । तैं जवळीक माझी | ज्ञाने.९.२५.३७८ |
| ५१३०४. थोरपण | तैसें लक्ष्मियेचें थोरपण न सरे । जेथ शंभूचेंही तप न पुरे । तेथ येर प्राकृत हेंदरें । केविं जाणों लाहे | ज्ञाने.९.२५.३८० |
| ५१३०५. थोरवनें | तरी बद्धमूळें अज्ञानें । महदादिकीं शासनें । वेदांचीं थोरवनें । घेऊनियां | ज्ञाने.१५.२.१४७ |
| ५१३०६. थोरा | कां शाखा सानिया थोरा । परि आहाति एकाचिये तरुवरा । बहु रश्मि परि दिनकरा । एकाचे जेवीं | ज्ञाने.९.१५.२५१ |
| ५१३०७. थोरा | आतां कृपाभांडवल सोडीं । भरीं मति माझी पोतडी । करीं ज्ञानपद्यजोडी । थोरा मातें | ज्ञाने.१४.१७ |
| ५१३०८. थोरां | परी रायारंका पाड धरूं । नेणती सानेयां थोरां कडसणी करूं । एकसरें आनंदाचें आवारू । होत जगा | ज्ञाने.९.१४.२०२ |
| ५१३०९. थोराडा | या थोराडा कीर कामा । विरजा नोहे आत्मा । परी म्हणसी हन उपक्रमा । हातु लावी | ज्ञाने.१८.१७.४५६ |
| ५१३१०. थोराडें | तंव तंव होती थोराडें । अकर्मांचीं तळबुडें । आणि जन्मशाखा पुढें पुढें । घेती धांव | ज्ञाने.१५.२.१६८ |
| ५१३११. थोरावती | ऐसा रजाचिया झुळुका । झडाडितां आगळिका । मनुष्यजातीशाखा । थोरावती | ज्ञाने.१५.२.१५५ |
| ५१३१२. थोरावती | पशु पक्षी सूकर । व्याघ्र वृश्चिक विखार । हे आडशाखानिकर । थोरावती | ज्ञाने.१५.२.१७० |
| ५१३१३. थोरावली | हें एकलौतें चराचर । अविचारित सुंदर । प्रसवोनि थोर । थोरावली | ज्ञाने.१४.३.११० |
| ५१३१४. थोरावले | पाठीं महर्षी येणें आले । साधकांचे सिद्ध जाहाले । आत्मविद थोरावले । येणेंचि पंथें | ज्ञाने.६.१०.१५६ |
| ५१३१५. थोरावे | ऐसा जरी थोरावे । तरी उपायें एकें आंगवे । जरी हातीं होय बरवें । ज्ञानखड्ग | ज्ञाने.४.४१.२०७ |
| ५१३१६. थोरावे | तैसें गुरुकुळींचेनि नांवें । महासुखें अति थोरावे । जे कोडेंही पोटाळावे । आकाश कां | ज्ञाने.१३.७.३८२ |
| ५१३१७. थोरावे | तो व्यापारु येणें नांवें । गगनाहूनि थोरावे । एकला करी आघवें । एके काळीं | ज्ञाने.१३.७.४३९ |
| ५१३१८. थोरावें | एऱ्हवीं या लक्षणांचिया निजसारा । मी अपाडें कीर अपुरा । परि तुमचेनि बोलें अवधारा । थोरावें जरी | ज्ञाने.६.१०.१४० |
| ५१३१९. थोरिये | अज्ञान थोरिये आणिजे । आपणपें तरी नेणिजे । तें रूप जाणिजे । क्षेत्रज्ञाचें | ज्ञाने.१४.३.८० |
| ५१३२०. थोरिये | ऐसेनि गा आटोपें । थोरिये आणती पापें । धर्मधेनु खुरपें । सुटलें जैसें | ज्ञाने.१६.१०.३२९ |
| ५१३२१. थोरिवेचें | कैसें थोरिवेचें मान पाहें पां । जो सृष्टिबीजाचा साटोपा । परि पुनरावृत्तीचिया मापा । शीग जाहला | ज्ञाने.८.१८-१९.१६६ |
| ५१३२२. थोरी | या गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी । जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारोनी | ज्ञाने.१.७० |
| ५१३२३. थोरी | ऐसें पार्थ तिये अवसरीं । म्हणे देवा अवधारीं । या कल्मषाची थोरी । सांगेन तुज | ज्ञाने.१.३८-३९.२४२ |
| ५१३२४. थोरी | कैसी दैवाची थोरी नेणिजे । जैसें तान्हेलिया तोय सेविजे । कीं तेंचि चवी करूनि पाहिजे । तंव अमृत आहे | ज्ञाने.६.३ |
| ५१३२५. थोरी | चाडचि निचाडां करी । ऐसी मनोरथीं ये थोरी । तेणें विवळले अंतरीं । तेथ डोलु आला | ज्ञाने.६.१०.१३५ |
| ५१३२६. थोरी | अभ्यासुचि आपणयातें करी । हृदयातें अनुभव वरी । ऐसी रम्यपणाची थोरी । अखंड जेथ | ज्ञाने.६.११.१६६ |
| ५१३२७. थोरी | वयसा तरी येतुलेवरी । एऱ्हवीं बळाचा बळार्थु करी । धैर्याची थोरी । निरुपम | ज्ञाने.६.१४.२६१ |

| | | |
|---|---|---|
| ५१३२८. थोरी | जेथींचिये अनित्यतेची थोरी । करितया ब्रह्मयाचें आयुष्यवेरी । कैसें नाहीं होणें अवधारीं । निपटूनियां | ज्ञाने.९.३३.५०६ |
| ५१३२९. थोरी | पैं आणिकही एके परी । इयेचि प्रतीतीची येतसे थोरी । जे मागें ऐसेंचि ऋषीश्वरीं । सांगितलें तूंतें | ज्ञाने.१०.१३.१५३ |
| ५१३३०. थोरी | जरी थोरी तुझी पाहत आहों । तरी पासीं उभे ठाकावयाही योग्य नोहों । या शोच्यता विनवूं बिहों । तरी आन उपायो नाहीं | ज्ञाने.१०.१५.१८२ |
| ५१३३१. थोरी | तया पाबळेयाही येतुलेवरी । गोडियेची आथि थोरी । मग हें तंव अवधारीं । परमामृत साचें | ज्ञाने.१०.१८.१९४ |
| ५१३३२. थोरी | चरणौनि मुकुटवरी । देखत विश्वरूपाची थोरी । जे नाना रत्न अलंकारीं । मिरवत असे | ज्ञाने.११.१०.२१० |
| ५१३३३. थोरी | जयाचे निर्लेप अनुलेपु करी । जे अनंगुही सर्वांगीं धरी । तया सुगंधाची थोरी । कवण वानी | ज्ञाने.११.११.२२५ |
| ५१३३४. थोरी | तैसे ते दिव्यसूर्य सहस्त्रवरी । जरी उदयजती कां एकेचि अवसरीं । तऱ्ही तया तेजाची थोरी । उपमूं न ये | ज्ञाने.११.१२.२३८ |
| ५१३३५. थोरी | नोहे तोचि हा शिरीं । मुकुट लेइलासि श्रीहरी । परि आतांचें तेज आणि थोरी । नवल कीं बहुवें | ज्ञाने.११.१७.२९४ |
| ५१३३६. थोरी | अमृताचां सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी । तेचि दे अमृतलहरी । चुळी घेतलिया | ज्ञाने.१२.१.२६ |
| ५१३३७. थोरी | जे मी प्रीति करीं । कां मनीं शिरसा धरीं । येवढी थोरी । जया स्थितीये | ज्ञाने.१२.१९.२२९ |
| ५१३३८. थोरी | इयेतें येतुलावरी । सौभाग्यव्याप्तीची थोरी । म्हणोनि तया आवरी । अनावरातें | ज्ञाने.१३.२१.९९७ |
| ५१३३९. थोरी | स्नेहाचिया भरोवरी । आंबुथिला दीपु घे थोरी । चाड अर्जुना अंतरीं । परिसतां तैसी | ज्ञाने.१३.३४.११४८ |
| ५१३४०. थोरी | विकारां बहुवस थोरी । अर्जुना हेंचि करी । म्हणोनि अवधारीं । महद्‌ब्रह्म | ज्ञाने.१४.३.६८ |
| ५१३४१. थोरी | कें ब्रह्मयाचां शेवटवरी । ऊर्ध्व शाखांची थोरी । आणि मूळ तंव निराकारीं । ऊर्ध्वीं असे | ज्ञाने.१५.३.२११ |
| ५१३४२. थोरी | जया देवाची पाहतां थोरी । विश्व परमाणुही दशा न धरी । तो भावाचिये सरोभरी । नव्हेचि काई | ज्ञाने.१६.३८ |
| ५१३४३. थोरी | तरी नरकव्यथा थोरी । आणावया दोषीं अघोरीं । मेळु केला ते आसुरी । संपत्ति हे | ज्ञाने.१६.३.२१५ |
| ५१३४४. थोरी | आमिषकवळु थोरी आशा । न विचारितां गिळी मासा । तैसें कीजे विषयाशा । तयांसि गा | ज्ञाने.१६.१२.३३७ |
| ५१३४५. थोरी | नई हो कां भलतैसी थोरी । परी गंगा जैं अंगीकारी । तैंचि तिये सागरीं । प्रवेशु गा | ज्ञाने.१७.२२.३२४ |
| ५१३४६. थोरी | दिवियेचां आंगीं थोरी । परी ते बहु तेज धरी । वाती आपुलिया परी । आणीच कीं ना | ज्ञाने.१८.७८.१७१५ |
| ५१३४७. थोरीव | तव करसंपुट आपैसें । वामचरणीं बैसे । बाहुमूळीं दिसे । थोरीव आली | ज्ञाने.६.१३.२०१ |
| ५१३४८. थोरीं | अगा थोरीं कल्लोळीं कल्लोळ साने । लोपतां तिरींचेनि जनें । एकीं एक गिळिलें हें मनें । मानिजे जऱ्हीं | ज्ञाने.१८.१७.४४२ |
| ५१३४९. थोरु | परी तो महाघोषु थोरु । गाजत असे गंहिरु । जैसा उदैला लोपी दिनकरु । नक्षत्रांतें | ज्ञाने.१.१५.१४४ |
| ५१३५०. थोरु | तया मग अपावो थोरु आहे । जेणें तें हातींचें सकळ जाये । देखा प्राप्तही न लाहे । भोग भोगूं | ज्ञाने.३.१२.१०८ |
| ५१३५१. थोरु | भूतांचां ठायीं कामु । तो मी म्हणे आत्मारामु । जेणें अर्थास्तव धर्मु । थोरु होय | ज्ञाने.७.१०-११.४६ |
| ५१३५२. थोरु | नातरी सोनयाचा डोंगरु । येसणा न चले हा थोरु । ऐसें म्हणोनि अव्हेरु । करणें घडे | ज्ञाने.११.४९.६२५ |
| ५१३५३. थोरु | ययावरी तो पांडुकुमरु । जाहला आनंदसंपदा थोरु । आणि कृष्णचरणचतुरु । एक तो जगीं | ज्ञाने.११.५५.७०१ |
| ५१३५४. थोरु | किंबहुना स्वधर्मीं थोरु । अवसरीं उदारु । आत्मचर्चे चतुरु । एऱ्हवीं वेडा | ज्ञाने.१३.७.२११ |

| | | |
|---|---|---|
| ५१३५५. थोरु | तुझा हाचि आम्हां थोरु । वक्तृत्वाचा पाहुणेरु । जे ज्ञानविषो फारु । निरोपिला | ज्ञाने.१३.११.६३४ |
| ५१३५६. थोरु | आणीकही येकु थोरु । यया अव्ययत्वाचा डगरु । आथी परी तो भीतरु । ऐसा असे | ज्ञाने.१५.१.११८ |
| ५१३५७. थोरु | एवं माळोवाळी उत्तरोत्तरु । ऊर्ध्वशाखांचा हा पैसारु । बुडी साना अग्रीं थोरु । फलाढ्यपणें | ज्ञाने.१५.२.१९८ |
| ५१३५८. थोरु | यालागीं हा अक्षरु । ऐसा वेदांतीं डगरु । केला देखसी थोरु । सिद्धांताचा | ज्ञाने.१५.१६.५२३ |
| ५१३५९. थोरु | यया आघवियांचाचि थोरु । एके वेळे आलिया पूरु । तरी अगस्ति कां होऊनि धीरु । उभा ठाके | ज्ञाने.१६.३.१९२ |
| ५१३६०. थोरु | आंगें सानें परिणामें थोरु । जैसें गुरुमुखींचें अक्षरु । तैशी अल्पीं जिहीं अपारु । तृप्ति राहे | ज्ञाने.१७.८.१२९ |
| ५१३६१. थोरु | ऐसा सात्त्विकु आहारु । परिणमला थोरु । करी हा उपकारु । सबाह्यासी | ज्ञाने.१७.८.१३७ |
| ५१३६२. थोरु | मज ईश्वरातें नोळखे । ना सृष्टिही करूं न शके । तो थोरु केला एकें । नामें जेणें | ज्ञाने.१७.२३.३३७ |
| ५१३६३. थोरु | एवढा आम्हां तुम्हां थोरु । केला येणें उपकारु । म्हणोनि हा व्याससहोदरु । गुरुत्वें होय | ज्ञाने.१७.२८.४३० |
| ५१३६४. थोरु | हा तो त्यागतरुवरु । जो गा मोक्षफळें ये थोरु । सात्त्विक ऐसा डगरु । यासींचि जगीं | ज्ञाने.१८.९.२०७ |
| ५१३६५. थोरु | म्हणौनि व्यासाचा हा थोरु । विश्वासि जाला उपकारु । श्रीकृष्णउक्ती आकारु । ग्रंथाचा केला | ज्ञाने.१८.७८.१७०७ |
| ५१३६६. थोरे | प्रमेयमहापूरें । हे मतिगंगा ये थोरे । तैसा वरिष उदारे । दिठीवेनी | ज्ञाने.१४.२२ |
| ५१३६७. थोरें | मग मेरूपासूनि थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें । दाटिजो पां परि भारें । चित्त न दटे | ज्ञाने.६.२२.३६९ |
| ५१३६८. थोरें | यालागीं साचोकारें । मनीं अहिंसा थावें थोरें । पिकली द्रुती आदरें । बोभात निघे | ज्ञाने.१३.७.३०४ |
| ५१३६९. थोरें | तैसीं चंद्रसूर्यादि थोरें । इयें तेजें जियें फारें । तियें जयाचेनि आंधारें । प्रकाशती | ज्ञाने.१५.६.३११ |
| ५१३७०. थोरें | पाठीं तिये निद्रेचेनि भरें । मी सुखी दुःखी म्हणत घोरें । अहंसमाधीचेनि थोरें । वोसणाये सादें | ज्ञाने.१५.१६.४९१ |
| ५१३७१. दंडवत | ऐसें अर्जुनें म्हणितलें । मग पुढती दंडवत घातलें । तेथें सात्त्विकाचें आलें । भरतें तया | ज्ञाने.११.४४.५६७ |
| ५१३७२. दंडवताचेनि | दंडवताचेनि प्रसंगें । भुयीं हन अंग लागे । वांचूनि येर नेघे । राभस्य तेथ | ज्ञाने.१८.५२.१०२८ |
| ५१३७३. दंडाचा | ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यासु दंडाचा । जाहला ठायीं जयाचां । देखशील | ज्ञाने.१३.७.३१० |
| ५१३७४. दंडितां | जिहीं विषयसंगु न सांडितां । इंद्रियांतें न दंडितां । परि भोगिली निसंगता । कामेंविण | ज्ञाने.५.१९.९७ |
| ५१३७५. दंडी | मग सरिसेपणें उठावले । दुणवटोनि उचलले । तया दंडी क्षोभलें । लोकत्रय | ज्ञाने.१.२०.१६५ |
| ५१३७६. दंडी | निंदा निस्तेज दंडी । कामलोभा वरपडी । परी रोमा नव्हे वांकुडी । मानसाची | ज्ञाने.१३.७.४९४ |
| ५१३७७. दंडील | म्हणऊनि स्वधर्मु जो सांडील । तयातें काळु दंडील । चोरु म्हणूनि हरील । सर्वस्व तयाचें | ज्ञाने.३.१२.११२ |
| ५१३७८. दंडु | अगा दमितयांमाझारीं । अनिवार दंडु तो मी अवधारीं । जो मुंगियेलागोनि ब्रह्मावेरीं । नियमित पावे | ज्ञाने.१०.३८.२९६ |
| ५१३७९. दंडुकाठी | इया केउतिया गोठी । नावडे दंडुकाठी । मग शस्त्राचें किरीटी । बोलणें कें | ज्ञाने.१३.७.२८३ |
| ५१३८०. दंडुनी | तो अहंकारातें दंडुनी । सकळ कामु सांडोनी । विचरे विश्व होऊनि । विश्वाचि माजीं | ज्ञाने.२.७१.३६७ |
| ५१३८१. दंडे | वेदीं अन्यायीं पडे । तो निरयभोगें दंडे । सन्यायी तो सुरवाडें । स्वर्गी जिये | ज्ञाने.१६.८.२९६ |

| | | |
|---|---|---|
| ५१३८२. दंडें | माजि उभारलेनि दंडें । शिरकमळ होय गाढें । नेत्रद्वारींचीं कवाडें । लागूं पाहती | ज्ञाने.६.१३.२०२ |
| ५१३८३. दंडें | का कवणें एकें पिंडें । वेंचितां अवतरे भांडें । मग भवंडीजे दंडें । भ्रमें चक्र | ज्ञाने.१८.१३.३१० |
| ५१३८४. दंडें | आणि बाहोंद्रियांचें धेंडें । पिटूनि विधीचेनि दंडे । नेदिजे अधर्माकडे । कहींचि जावों | ज्ञाने.१८.४२.८३५ |
| ५१३८५. दंतु | एके हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु । तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकांचा | ज्ञाने.१.१२ |
| ५१३८६. दंदिया | आणि इसाळु जैसा घरा । कां दंदिया हतियेरा । न विसंबे भांडारा । बद्धकु जैसा | ज्ञाने.१३.७.५०१ |
| ५१३८७. दंभमानाचा | तया कामाचा वोलावा । जीवीं धरूनि पांडवा । दंभमानाचा मेळावा । मेळविती | ज्ञाने.१६.१०.३२४ |
| ५१३८८. दंभादि | आणि दंभादि दोष साही । हे संपूर्ण जयांचां ठायीं । ते त्यजावे हें काई । म्हणों कीर | ज्ञाने.१६.२०.४२४ |
| ५१३८९. दंभु | जेणें सत्याचा भोकसा काढिला । मग अकृत्य तृणकुटा भरिला । तो दंभु रूढविला । जगीं इहीं | ज्ञाने.३.३७.२५० |
| ५१३९०. दंभु | तरी तयाचि आसुरां । दोषांमाजीं जया वीरा । वाडपणाचा डांगोरा । तो दंभु ऐसा | ज्ञाने.१६.४.२१७ |
| ५१३९१. दंभु | म्हणौनि वाचेचा चौबारा । घातलिया धर्माचा पसारा । धर्मुचि तो अधर्मु होय वीरा । तो दंभु जाणें | ज्ञाने.१६.४.२२३ |
| ५१३९२. दंशु | पिंडें पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतींचा दंशु । परि दाऊनि गेला उद्देशु । महाविष्णु | ज्ञाने.६.१४.२९१ |
| ५१३९३. दंशु | हा दंशु जंव नये हातां । तंव माझें साचोकारपण पार्था । न संपडे गा सर्वथा । जेविं भुसीं कण | ज्ञाने.९.१०.१३६ |
| ५१३९४. दंशु | स्मृतींची चर्चा । दंशु जाणे गारुडियाचा । निघंटु प्रज्ञेचा । पाइकी करी | ज्ञाने.१३.११.८३२ |
| ५१३९५. दंष्ट्रांचीं | तिये रत्नें दांतांचिये सवडी । कूट लागलें जिभेचां बुडीं । कांहीं कांहीं आगरडीं । दंष्ट्रांचीं माखलीं | ज्ञाने.११.२७.४१६ |
| ५१३९६. दक्षता | शौर्य तेज दक्षता । एवमादिक पंडुसुता । गुण दिधले जन्मतां । प्रकृती तुज | ज्ञाने.१८.६०.१२८९ |
| ५१३९७. दक्षत्व | तें दक्षत्व गा चोख । जेथ चौथा गुण देख । आणि जुंझ अलौकिक । तो पांचवा गुण | ज्ञाने.१८.४३.८६४ |
| ५१३९८. दक्षिण | दक्षिण उत्तर मारुता । मेरु जैसा पांडुसुता । तैसा सुखदुःखप्राप्ता । मध्यस्थु जो | ज्ञाने.१२.१८.२०३ |
| ५१३९९. दक्षिणवाम | सांडूनि दक्षिणवाम । प्राणापान सम- । चित्तेंसीं व्योम- । गामिये करिती | ज्ञाने.५.२७.१५३ |
| ५१४००. दक्षिणा | वैराचा बोधु ब्राह्मणा । तेथ कें रिगेल दक्षिणा । अग्नि जाला वाउधाणा । वरपडा जैसा | ज्ञाने.१७.१३.१९३ |
| ५१४०१. दक्षिणायन | आणि देहाआंतु ऐसी स्थिती । बाहेरि कृष्णपक्षु वरि राति । आणि सामासही ते वोडवती । दक्षिणायन | ज्ञाने.८.२५.२३३ |
| ५१४०२. दक्षिणिलीं | ऐसें युगीं परी कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं । श्रीगोदावरीचां कूलीं । दक्षिणिलीं | ज्ञाने.१८.७८.१८०२ |
| ५१४०३. दक्षिणु | मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु । आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो | ज्ञाने.१८.६६.१४१८ |
| ५१४०४. दक्षु | तूं प्राप्तीची चाड वाहसी । परि अभ्यासीं दक्षु नव्हसी । तें सांग पां काय बिहसी । दुवाडपणा | ज्ञाने.६.१९.३६० |
| ५१४०५. दक्षु | म्हणोनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षूचां ठायीं पक्षु । बोलावया दक्षु । जाहला वेदु | ज्ञाने.१३.१३.८७७ |
| ५१४०६. दक्षु | कृपणु चित्तीं ठेवा आपुला । तैसा दक्षु पराविया मोला । बकु जैसा खुतला । मासेयासी | ज्ञाने.१८.२७.६५४ |
| ५१४०७. दक्षु | म्हणौनि तो मुमुक्षु । आत्मज्ञानीं जाला दक्षु । परी पुढां सूनि पक्षु । योगाभ्यासाचा | ज्ञाने.१८.५२.१०३५ |
| ५१४०८. दगड | ते पापयोनि मूढ । मूर्ख ऐसे जे दगड । परि माझां ठायीं दृढ । सर्वभावें | ज्ञाने.९.३२.४४४ |

| | | |
|---|---|---|
| ५१४०९. दगडाचेनि | पाहतां पृथ्वीचें मोल थोडें । ऐसें अनर्घ्य रत्न चोखडें । देखें दगडाचेनि पाडें । निचाडु ऐसा | ज्ञाने.६.८.९३ |
| ५१४१०. दग्धलीं | परि तें बीजें जैसीं दग्धलीं । नुगवतीचि पेरिलीं । तैशीं कर्मेचि परि तयां जाहलीं । मोक्षहेतु | ज्ञाने.४.१५.८३ |
| ५१४११. दचकती | दिगंतीचे भूपति । भाट होऊनि वाखाणिती । जे ऐकिलिया दचकती । कृतांतादिक | ज्ञाने.२.३६.२१२ |
| ५१४१२. दचकला | तेथ भेडांची कवण मातु । कांचया केर फिटतु । जेणें दचकला कृतांतु । आंग नेघे | ज्ञाने.१.१३.१३४ |
| ५१४१३. दटे | मग मेरूपासूनि थोरें । देह दु:खाचेनि डोंगरें । दाटिजो पां परि भारें । चित्त न दटे | ज्ञाने.६.२२.३६९ |
| ५१४१४. दडगी | पंचाग्नींची दडगी । खोलवीजती शरीरालागीं । का इंधन कीजे हें आगी- । आंतु लावी | ज्ञाने.१७.१९.२५५ |
| ५१४१५. दडपलिया | तेव्हां दृष्टादृष्ट स्पृहे । निमणें जालेंचि आहे । आगी दडपलिया धुयें । राहिजे जैसें | ज्ञाने.१८.४९.९६२ |
| ५१४१६. दडपूनि | मग कापतां करतळीं । दडपूनि रोमावळी । पुलिका स्वेदजळीं । जिरऊनियां | ज्ञाने.१८.७२.१५५३ |
| ५१४१७. दडपे | कीं पवनाचेनि कोपें । पाणियेंचि जो पळिपे । तो प्रळयानळु दडपे । तृणें काष्ठें काई | ज्ञाने.४.३७.१७७ |
| ५१४१८. दडपे | जो बहुवें विषयविलासें गुंफे । तो म्हणती उवायें पडिला सापें । जो अभिलाषभारें दडपे । तयातें सज्ञान म्हणती | ज्ञाने.९.३३.५०९ |
| ५१४१९. दडे | तोही आंथरुणातळवटीं दडे । येरु नेति नेति म्हणोनि बहुडे । एथ सनकादिक वेडे । पिसे जाहाले | ज्ञाने.९.२५.३७१ |
| ५१४२०. दडे | वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे । परि वेडिवेमाजीं दडे । महिमेभेणें | ज्ञाने.१३.७.१९० |
| ५१४२१. दत्तचित्तु | म्हणोनि तो भगवंतु । जो नि:संगाचा सांगातु । तो म्हणे पार्था दत्तचित्तु । होईं आतां | ज्ञाने.६.३८ |
| ५१४२२. दत्तचित्तु | परी तयां तिहींआंतु । सात्त्विक तंव प्रस्तुतु । सांगेन दत्तचित्तु । आकर्णीं तूं | ज्ञाने.१८.२५.६३० |
| ५१४२३. दधिकडसणी | ना तरी जाणिवेचिया आयणी । करितां दधिकडसणी । मग नवनीत निर्वाणीं । दिसे जैसें | ज्ञाने.२.१६.१२९ |
| ५१४२४. दधी | दधी जळाचिया घुसळणा । व्यापार सारिखेचि विचक्षणा । वाळुवे तिळा घाणा । गाळणें एक | ज्ञाने.१८.४८.९४० |
| ५१४२५. दम | मग शम दम दोन्ही । सुख दु:ख वर्तत जनीं । अर्जुना भावाभाव मानीं । भावाचिमाजीं | ज्ञाने.१०.४-५.८४ |
| ५१४२६. दम | तो पैं गा शमा विरजा । दम गुण जेथ दुजा । आणि स्वधर्माचिया वोजा । जिणें जें कां | ज्ञाने.१८.४२.८३६ |
| ५१४२७. दमन | म्हणोनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दु:खाचें । या कारणें इंद्रियांचें । दमन निकें | ज्ञाने.२.६६.३४७ |
| ५१४२८. दमाचें | तया नांव जाण दान । जें मोक्षनिधानाचें अंजन । हें असो ऐक चिन्ह । दमाचें तें | ज्ञाने.१६.१.८८ |
| ५१४२९. दमावें | यमु म्हणे काय यमावें । दमु म्हणे कवणातें दमावें । तीर्थे म्हणती काय खावें । दोष ओखदासि नाहीं | ज्ञाने.९.१४.१९९ |
| ५१४३०. दमितयांमाझारीं | अगा दमितयांमाझारीं । अनिवार दंडु तो मी अवधारीं । जो मुंगियेलागोनि ब्रह्मावेरीं । नियमित पावे | ज्ञाने.१०.३८.२९६ |
| ५१४३१. दमु | यमु म्हणे काय यमावें । दमु म्हणे कवणातें दमावें । तीर्थे म्हणती काय खावें । दोष ओखदासि नाहीं | ज्ञाने.९.१४.१९९ |
| ५१४३२. दमु | पैं दमु ऐसें म्हणिपे । तो हा जाण स्वरूपें । यागार्थुही संक्षेपें । सांगों ऐक | ज्ञाने.१६.१.९३ |
| ५१४३३. दया | जेथ जेथ संपत्ति आणि दया । दोन्ही वसती आलिया असती ठाया । ते ते जाण धनंजया । विभूति माझी | ज्ञाने.१०.४१.३०७ |
| ५१४३४. दया | ऐसी जयाची चाली । कृपाफळीं फळा आली । देखसी जियाली । दया वाचे | ज्ञाने.१३.७.२६० |
| ५१४३५. दया | आतां दया ते ऐसी । पूर्णचंद्रिका जैसी । निववितां न कडसी । सानें थोर | ज्ञाने.१६.२.१५४ |

| | | |
|---|---|---|
| ५१४३६. दया | तो पुरुष वीरराया । मूर्तिमंत जाण दया । मी उदयजतांचि तया । ऋणिया लाभें | ज्ञाने.१६.२.१६२ |
| ५१४३७. दया | दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु । सुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा | ज्ञाने.१८.७८.१६३४ |
| ५१४३८. दयार्णव | जयजय देव विशुद्ध । विदुदयोद्यानद्विरद । शमदममदनमदभेद । दयार्णव | ज्ञाने.१८.७ |
| ५१४३९. दयालुत्व | तैसें दयालुत्व आपुलें । मनें हातापायां आणिलें । मग तेथ उपजविलें । अहिंसेतें | ज्ञाने.१३.७.३०८ |
| ५१४४०. दरकुटा | हें जाणों मृत्यु रागिटा । सिंहाडयाचा दरकुटा । परी काय वांजटा । पूरीजत असे | ज्ञाने.१३.४.५९ |
| ५१४४१. दरकुटा | कां रसनेचिया वाटा । निघोनि गा सुभटा । रसाचा दरकुटा । भरोंचि लागे | ज्ञाने.१५.७.३५८ |
| ५१४४२. दरकुटे | पाखांडाचे दरकुटे । मोडीं वाग्वादअव्हांटे । कुतर्कांचीं दुष्टें । सावजें फेडीं | ज्ञाने.१२.१४ |
| ५१४४३. दरारा | तैसा संसारु हा वीरा । रुख नाहीं साचोकारा । मा उन्मूळणीं दरारा । कायिसा तरी | ज्ञाने.१५.३.२१६ |
| ५१४४४. दरारा | तैसा कर्माकर्माचिया मोहरा । उठूं नेदूनि अहंकारा । संसाराचा दरारा । सांडणें येणें | ज्ञाने.१६.१.७० |
| ५१४४५. दरारा | व्याळा कां हारा । वरपडा जालेया नरा । हरिखु आणि दरारा । सरसाचि उठी | ज्ञाने.१८.१८.४८८ |
| ५१४४६. दरिद्र | तयां कर्मत्यागु न घडे । जें कर्तव्य मनीं सांपडे । वरी नटती तें फुडें । दरिद्र जाण | ज्ञाने.३.६.६५ |
| ५१४४७. दरिद्र | घाणां गाळिले गुंडे । तेथ तेल ना पेंडी जोडे । तैसें दरिद्र तेवढें । ठेलेंचि आंगीं | ज्ञाने.१७.२८.४१९ |
| ५१४४८. दरिद्र | हां गा रोगु कायी रोगिया । आवडे दरिद्र दरिद्रिया । परी भोगविजे बळिया । अदृष्टें जेणें | ज्ञाने.१८.६०.१२९७ |
| ५१४४९. दरिद्रलिये | तैं मीचि कां कर्मठ । ऐसा न ये श्रीमाठ । कां दरिद्रलिये बुद्धी वीट । तोही नाहीं | ज्ञाने.१४.२२.३२८ |
| ५१४५०. दरिद्रिया | हां गा रोगु कायी रोगिया । आवडे दरिद्र दरिद्रिया । परी भोगविजे बळिया । अदृष्टें जेणें | ज्ञाने.१८.६०.१२९७ |
| ५१४५१. दरिद्रें | नातरी निदैवाचां परिवरीं । लोह्या रुतलिया आहाति सहस्त्रवरीं । परि तेथ बैसोनि उपवासु करी । कां दरिद्रें जिये | ज्ञाने.९.३.५९ |
| ५१४५२. दरी | जे अनर्थाचे कानवेरी । आवाळुवें चाटीत निघे बाहेरी । जे प्रमादपर्वतींची दरी । सदाचि मातली | ज्ञाने.९.१२.१८२ |
| ५१४५३. दरीमाजीं | तैसीं जियेतियेकडे । तुझीं वक्त्रें जीं प्रचंडें । न समाती दरीमाजीं सिंहाडें । तैसें दांत दिसती रागीट | ज्ञाने.११.२३.३४४ |
| ५१४५४. दर्दुर | तयां दु:खियां दु:खचि जिव्हार । विषयकर्दमींचे दर्दुर । ते भोगजळाते जलचर । सांडिती केवीं | ज्ञाने.५.२२.१२२ |
| ५१४५५. दर्दुर | दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा । कीं तो मासिया वेटाळी जिभा । तैसे प्राणिये कवणा लोभा । वाढविती तृष्णा | ज्ञाने.९.३३.५१४ |
| ५१४५६. दर्दुरा | मकरंदकणाचा चारा । जाणतां घालूनि दर्दुरा । वायां धाडा शार्ङ्गधरा । कोपा कवणा | ज्ञाने.११.८.१५८ |
| ५१४५७. दर्दुरीं | कां कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकेचि घरीं । परि परागु सेविजे भ्रमरीं । जवळिलां चिखलुचि उरे | ज्ञाने.९.३.५८ |
| ५१४५८. दर्दुरु | एका कणालागीं उंदिरु । आसका उपसे डोंगरु । कां शेवाळोद्देशें दर्दुरु । समुद्रु डहुळी | ज्ञाने.१८.२४.६०७ |
| ५१४५९. दर्दूरें | कीं लवणेंचि जळ विरे । संसर्गे काळकूट मरे । सांग महाफणी दर्दूरें । गिळिजे कायी | ज्ञाने.२.२.१५ |
| ५१४६०. दर्पण | कां प्रभावीण भानु । धूमेंवीण हुताशनु । जैसा दर्पण मळहीनु । कहींच नसे | ज्ञाने.३.३८.२६१ |
| ५१४६१. दर्पणाचिया | दर्पणाचिया जवळिका । दुजेपण जैसें ये मुखा । कां कुंकुमें स्फटिका । लोहित्व ये | ज्ञाने.१३.२१.१०१७ |
| ५१४६२. दर्पणाचीचि | चोखटिवा आपुलिया । पुढिला उगाणा घेयावया । तया दर्पणाचीचि परी धनंजया । केली आम्हां | ज्ञाने.१५.२०.५७९ |

| ५१४६३. दर्पणाचेनि | कीं एकचि दिसे दुसरें । तें दर्पणाचेनि आधारें । एऱ्हवीं काय वस्तुविचारें । दुजें आहे | ज्ञाने.४.६.४७ |
|---|---|---|
| ५१४६४. दर्पणाचेनि | परि दर्पणाचेनि आधारें । एकचि करून दुसरें । मुख पाहाती गव्हारें । तैसें नको हें | ज्ञाने.१५.४.२६८ |
| ५१४६५. दर्पणातें | पैं दर्पणातें दर्पणें । पाहिलिया होय न पाहणें । सोनें झांकिलिया सुवर्णें । न झांके जेवीं | ज्ञाने.१८.५५.११७५ |
| ५१४६६. दर्पणाधारें | जैसें क्षेत्रीं जें पेरिजे । तेंवांचूनि आन न निपजे । कां पाहिजे तेंचि देखिजे । दर्पणाधारें | ज्ञाने.४.१२.७४ |
| ५१४६७. दर्पणावीण | गोडी न होतीं पक्वान्नें । तरी कां फावती रसने । दर्पणावीण नयनें । नयनु का दिसे | ज्ञाने.१८.७८.१७०२ |
| ५१४६८. दर्पणाहूनि | पैं दर्पणाहूनि चोखें । दोन्ही होती सन्मुखें । तेथ येरीं येर देखे । आपणपें जैसें | ज्ञाने.१८.७४.१५९० |
| ५१४६९. दर्पणु | म्हणऊनि भावार्थु तो ऐसा । अर्जुन मैत्रियेचा कुवासा । कीं सुखें शृंगारलिया मानसा । दर्पणु तो | ज्ञाने.६.१०.१२५ |
| ५१४७०. दर्पणु | हें असो दर्पणु नेलिया । तो मुखबोधुही गेलिया । देखलेपण एकलेया । आस्वादिजे जेवीं | ज्ञाने.१८.५५.११४१ |
| ५१४७१. दर्पणें | पैं दर्पणातें दर्पणें । पाहिलिया होय न पाहणें । सोनें झांकिलिया सुवर्णें । न झांके जेवीं | ज्ञाने.१८.५५.११७५ |
| ५१४७२. दर्पसागरु | ऐसा अहंकार बळा । जालिया एकवळा । दर्पसागरु वेळा । सांडूनि उते | ज्ञाने.१६.१८.३९३ |
| ५१४७३. दर्पा | तेथ देखोनि तो आथिला । योग्यु मार्गोंही आला । तोही दर्पा चढला । भांबावे जरी | ज्ञाने.१७.२२.३०२ |
| ५१४७४. दर्पु | किंबहुना ऐसैसें । उतणें जें संपत्तिमिसें । तो दर्पु गा अनारिसें । न बोलें घेई | ज्ञाने.१६.४.२२९ |
| ५१४७५. दर्पु | तैसा अहंकारु बळा आला । दर्पु कामक्रोधीं गुढला । या दोहींचा मेळु जाला । जयांचां ठायीं | ज्ञाने.१६.१८.३९६ |
| ५१४७६. दर्पु | तो विश्वासें मारितां रिपु । निवटूनि घातला दर्पु । आणि जयाचा अहा कंपु । तापसांसी | ज्ञाने.१८.५३.१०५७ |
| ५१४७७. दर्पें | मग वोसंडिलेनि दर्पें । कामाही पित्त कुरुपे । तया धर्गी सैंघ पळिपे । क्रोधाग्नि तो | ज्ञाने.१६.१८.३९४ |
| ५१४७८. दर्पें | आपलेनीचि आटोपें । धनित्वाचेनि दर्पें । साचचि पाखांडाचीं तपें । आदरिती | ज्ञाने.१७.५.९५ |
| ५१४७९. दर्वी | नातरी नानारसीं । रिघोनि दर्वी जैसी । परी रसस्वादासी । नेणे जेवी | ज्ञाने.१६.४.२४८ |
| ५१४८०. दर्शन | मग देखिजे ना न देखिजे । ऐसी जे दशा निपजे । ते तें दर्शन माझें । साचोकारें | ज्ञाने.१८.५५.११६३ |
| ५१४८१. दर्शन | एवं तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन । अद्वया मज गमन । तो चाले तेंचि | ज्ञाने.१८.५५.११८० |
| ५१४८२. दर्शना | सर्व दु:खीं आपुलिया । दर्शना धनंजया । पाढाऊ हे भलतया । दिधलें आहाती | ज्ञाने.१६.२१.४२६ |
| ५१४८३. दर्शनाचिये | अथवा संभ्रमाचिया आयती । स्नेहो जैसा ये व्यक्ति । कां दर्शनाचिये प्रशस्ती । पुण्यपुरुष | ज्ञाने.१३.५-६.१८१ |
| ५१४८४. दर्शनाची | हें एकैक आश्चर्य पाहतां । तिये एकेचि रूपीं पांडुसुता । दर्शनाची अनेकता । प्रतिफळली | ज्ञाने.११.१०.२०५ |
| ५१४८५. दर्शनाचेनि | ऐसा अर्जुनु असाधारणें । आपुलिया दर्शनाचेनि विंदाणें । कवळूनि घेतला तेणें । अनंतरूपें | ज्ञाने.११.११.२३२ |
| ५१४८६. दर्शनीं | देवा तुझां ये दर्शनीं । जें वैकल्य उपजलें आहे अंत:करणीं । तें सांवरावयालागीं गंवसणी । धैर्याची करितसें | ज्ञाने.११.२४.३७१ |
| ५१४८७. दर्शनीं | गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन । दर्शनीं समाधान । आथी जैसें | ज्ञाने.१८.७८.१६३६ |
| ५१४८८. दर्शनें | जयाचें नांव तीर्थरावो । दर्शनें प्रशस्तीसि ठावो । जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासी | ज्ञाने.६.९.१०२ |
| ५१४८९. दर्शनें | चाळितां हेंचि बोली । दर्शनें शेवटा आलीं । तेवींचि नाहीं बुझाविलीं । अझुनि द्वंद्वें | ज्ञाने.१३.३.१५ |

| | | |
|---|---|---|
| ५१४९०. दर्शनें | ना ना मावळतेनि तपनें । नेइजती लोकांचीं दर्शनें । हें असो द्रुती पवनें । नेईजे जैसी | ज्ञाने.१५.८.३६६ |
| ५१४९१. दर्शनें | कां अगस्त्याचेनि दर्शनें । सिंधु घेऊनी ठाती मौनें । चंद्रोदयीं कमळवनें । मिठी देती | ज्ञाने.१८.३३.७३५ |
| ५१४९२. दळ | तैसें दळ दुर्धर । नानाव्यूहीं परिकर । अवगमलें भयासुर । तिये काळीं | ज्ञाने.१.२-३.९१ |
| ५१४९३. दळ | हा मृगजळाचा पूर आला । दळ नव्हे कापडाचा साप केला । इया शृंगारूनियां खाला । मांडिलिया पैं | ज्ञाने.११.३२.४६५ |
| ५१४९४. दळभार | मग पुनरपि काय बोले । सकळ सैनिकांतें म्हणितलें । आतां दळभार आपुलाले । सरसे करा | ज्ञाने.१.११.१२१ |
| ५१४९५. दळभार | तो घोष तरी उपसंहरला । परी पडिसाद होता राहिला । तेणें दळभार विध्वंसिला । कौरवांचा | ज्ञाने.१.१९.१६१ |
| ५१४९६. दळभार | तेथ स्थिर करूनि रथु । अर्जुन असे पाहातु । तो दळभार समस्तु । संभ्रमेंसीं | ज्ञाने.१.२५-२७.१७६ |
| ५१४९७. दळभारु | मग द्रोणापासीं आला । तयातें म्हणे हा देखिला । कैसा दळभारु उचलला । पांडवांचा | ज्ञाने.१.२-३.९३ |
| ५१४९८. दळभारु | हाचि एकु रक्षावा । मी तैसा हा देखावा । येणें दळभारु आघवा । साचु आमुचा | ज्ञाने.१.११.१२४ |
| ५१४९९. दळवाडें | योगनिद्रा तरी न मोडे । अकर्तेपणा सळु न पडे । परी महाभूतांचें दळवाडें । उभारी भलें | ज्ञाने.५.१४.७८ |
| ५१५००. दळवाडें | जैं लोकांची ये व्यवस्था न पडे । जैं या त्रिभुवनाचें कांहीं न मांडे । तैं महाभूतांचें दळवाडें । अचुंबित असे | ज्ञाने.१०.६.९५ |
| ५१५०१. दळवाडें | तें हें तुझिये चाडे । आजि जिवाचेंचि दळवाडें । कामऊनियां येवढें । रचिलें ध्यान | ज्ञाने.११.४७.६१२ |
| ५१५०२. दळवाडें | केळींचें दळवाडें । हळू पोकळ आवडे । परि फळोनियां गाढें । रसाळ जैसें | ज्ञाने.१३.७.२१२ |
| ५१५०३. दळवाडें | कां रत्नाचें दळवाडें । तैसें सबाह्य चोखडें । आंत बाहेरि एकें पाडें । सुर्यु जैसा | ज्ञाने.१३.७.४६२ |
| ५१५०४. दळवाडें | तैसें श्रद्धेचें दळवाडें । आंगें कीर चोखडें । परी प्राणियांचां पडे । विभागीं जैं | ज्ञाने.१७.२.५५ |
| ५१५०५. दळवाडें | माजीं आत्मज्ञानाचें एकवट । दळवाडें झाडूनि चोखट । घडिलें पार्थवैकुंठ- । संवाद कुसरी | ज्ञाने.१८.३७ |
| ५१५०६. दळवाडें | कामनेचेनि दळवाडें । जें उभारावया घडे । अश्वमेधादिक फुडे । याग जेथ | ज्ञाने.१८.२.९८ |
| ५१५०७. दळवाडें | तेथ शरीरादिक दळवाडें । शरीरादिकां हेतुचि घडे । लोहकाम लोखंडें । निर्वाळिजे जैसें | ज्ञाने.१८.१५.३५९ |
| ५१५०८. दळवाडें | तैसें मनवाचादेहांचें । कर्म मनादि हेतुचि रचे । रत्नीं घडे रत्नाचें । दळवाडें जेवीं | ज्ञाने.१८.१५.३६१ |
| ५१५०९. दळवैपणाचा | वरी क्षत्रियांमाजि श्रेष्ठु । जो जगजेठी जगीं सुभटु । तया दळवैपणाचा पाटु । भीष्मासी पैं | ज्ञाने.१.१०.११५ |
| ५१५१०. दळही | आणि येरांचेनि पाडें । दळही यांचे देव्हडें । म्हणौनि जैत फुडें । आणील ना तें | ज्ञाने.१८.७७.१६२९ |
| ५१५११. दळां | ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा । आतां झडकरी रथु पेलावा । नेऊनि मध्यें घालावा । दोहीं दळां | ज्ञाने.१.२१.१६९ |
| ५१५१२. दळाचि | वन्हि तेचि ज्वाळ । दळाचि नांव कमळ । रुख तेंचि डाळ । फळादिक | ज्ञाने.१४.२६.३७५ |
| ५१५१३. दळातें | तेथ बळें प्रौढीपुरते । जे महारथी वीर होते । तिहीं पुनरपि दळातें । आवरिलें | ज्ञाने.१.२०.१६४ |
| ५१५१४. दळामाजि | तेणें महाघोषगजरें । दुमदुमिताती गिरिकंदरें । तंव दळामाजि रणतुरें । आस्फारिलीं | ज्ञाने.१.१२.१३० |
| ५१५१५. दळीं | आतां आमुचां दळीं नायक । जे रूढ वीर सैनिक । ते प्रसंगें आइक । सांगिजती | ज्ञाने.१.७-८.१०३ |
| ५१५१६. दळीं | ऐसे सर्वांपरी पुरते । वीर दळीं आमुतें । आतां काय गणूं यांतें । अपार हे | ज्ञाने.१.९.११४ |

| | | |
|---|---|---|
| ५१५१७. दळीं | ऐसे गोत्रचि दोहीं दळीं । उदित जालें असे कळीं । हें अर्जुनें तिये वेळीं । अवलोकिलें | ज्ञाने.१.२५-२७.१८४ |
| ५१५१८. दळें | तेथ म्हणे पाहा हो एके वेळे । सासिकवचेंसि दोन्ही दळें । वदनीं गेलीं आभाळें । गगनीं कां जैसीं | ज्ञाने.११.२७.४१० |
| ५१५१९. दळें | मग देहाहंतेचें दळें । सांडूनि एकेचि वेळे । प्रत्यग्बुद्धी करतळें । हातवसावें | ज्ञाने.१५.३.२५८ |
| ५१५२०. दवडणें | कीं संजयो दुखवलेनि अंत:करणें । म्हणतसे नवल नव्हे दैव दवडणें । हा जीवें धाडसा आहे मी म्हणें । तंव आंतुही आंधळा | ज्ञाने.१०.४२.३२९ |
| ५१५२१. दवडणें | अथवा ऐक्यभावाचेनि पैसें । दुजे मानूनि आत्मा ऐसें । भयवार्ता देशें । दवडणें जें | ज्ञाने.१६.१.७१ |
| ५१५२२. दवडणें | हें काम्यकर्म सांडणें । तें कामनेतेंचि उपडणें । धनत्यागें दवडणें । भय जैसें | ज्ञाने.१८.२.१०९ |
| ५१५२३. दवडा | हां हो सूर्य म्हणे काय जगातें । अंधारें दवडा कां परौतें । केवीं धसाळ म्हणो देवा तूंतें । तरी अधिक हा बोलु | ज्ञाने.१०.४२.३२० |
| ५१५२४. दवडा | हृदयवृत्ती पुढां । आंगचि घे दवडा । काज करी होडा । मानसेंशीं | ज्ञाने.१३.७.४४० |
| ५१५२५. दवडा | स्पृहा मना पुढां पुढां । आशेचा घे दवडा । विश्व घापे चाडा । पायांतळीं | ज्ञाने.१४.११-१५.२३६ |
| ५१५२६. दवडावा | परी हा उन्मूळावया दोषें । येथ सायासचि कायिसे । काय बाळा बागुल देशें । दवडावा आहे | ज्ञाने.१५.३.२१४ |
| ५१५२७. दवडिजे | असता दीपु दवडिजे । मग अंधकारीं राहाटिजे । तरी उजूचि का आडळिजे । जयापरी | ज्ञाने.१.४१.२४७ |
| ५१५२८. दवडिजे | दैवें चिंतामणि लेईजे । कीं हें ओझें म्हणोनि सांडिजे । कामधेनु दवडिजे । न पोसे म्हणोनि | ज्ञाने.११.४९.६२६ |
| ५१५२९. दवडितां | तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं वैराग्य दवडितां । पाठीं लागे | ज्ञाने.१५.३९ |
| ५१५३०. दवडितां | जें सारसांही बिघडतां । होय वोहाहूनि वत्स काढितां । नव्हे भणंगु दवडितां । भाणयावरुनी | ज्ञाने.१८.३७.७८५ |
| ५१५३१. दवडी | जी मेघ आपुलिये प्रौढी । जगाची आर्ति दवडी । वांचूनि चातकाची ताहान केवढी । तो वर्षावो पाहुनी | ज्ञाने.९.१४.२३५ |
| ५१५३२. दवडुनि | परि ते करिती ऐसें । अभिमानु दवडुनि देशें । एकाचिया विश्वासें । टेंकती बोला | ज्ञाने.१३.२५.१०४१ |
| ५१५३३. दवडुनी | परी आळसु सांडुनी । फळकाम दवडुनी । आंगें जीवें मांडुनी । तेथेंचि भरु | ज्ञाने.१८.४५.८९४ |
| ५१५३४. दवडूनि | तरी वैराग्याचेनि आधारें । जिहीं विषय दवडूनि बाहिरें । शरीरीं एकंदरें । केले मन | ज्ञाने.५.२७.१५१ |
| ५१५३५. दवडूनि | सेविली अमृतसरिता । रोगु दवडूनि पंडुसुता । अमरपण उचिता । देऊनि घाली | ज्ञाने.१५.२०.५८३ |
| ५१५३६. दवडे | तूतें करूनि पुढें । जे उपायें घेती दवडे । तयां ठासी बहुवें पाडें । मागांचि तूं | ज्ञाने.१७.१२ |
| ५१५३७. दवडोनि | दवडोनि श्वासोश्वास । कीजती वायांचि उपवास । कां घेपती धूमाचे घांस । अधोमुखें | ज्ञाने.१७.१९.२५७ |
| ५१५३८. दशकु | तरि महाभूतपंचकु । आणि अहंकारु एकु । बुद्धि अव्यक्त दशकु । इंद्रियांचा | ज्ञाने.१३.५-६.७२ |
| ५१५३९. दशकु | आणीकही एकु । विषयांचा दशकु । सुख दुःख द्वेषु । संघात इच्छा | ज्ञाने.१३.५-६.७३ |
| ५१५४०. दशकुही | आघवयाचि विजूंचा मेळावा कीजे । आणि प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे । तेवींचि दशकुही मेळविजे । महातेजांचा | ज्ञाने.११.१२.२३९ |
| ५१५४१. दशदिशा | कां जे भूर्लोक पाताळ । पृथिवी हन अंतराळ । अथवा दशदिशा समाकुळ । दिशाचक्र | ज्ञाने.११.२०.३१५ |
| ५१५४२. दशधा | आणि शुक्रशोणिताचा सांधा । मिळतां पांचांचा बांधा । वायुतत्त्व दशधा । एकचि जाहलें | ज्ञाने.१३.५-६.१०६ |
| ५१५४३. दशन | स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार । मुख मोहाचें माहेर । माधुर्या जाहले अंकुर । दशन तैसे | ज्ञाने.१३.७.२६१ |

| | | |
|---|---|---|
| ५१५४४. दशनीं | तंव विचाराचिया रसना न दाटती । परी हेतूचांहि दशनीं न फुटती । ऐसें जाणोनि सुभद्रापती । चुंबीचिना | ज्ञाने.७.३०.१९३ |
| ५१५४५. दशनु | तरी संवादु तोचि दशनु । जो समताशुभ्रवर्णु । देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु | ज्ञाने.१.१५ |
| ५१५४६. दशा | जैसी भातारेंहीन वनिता । उपहति पावे सर्वथा । तैशी दशा जीविता । स्वधर्मेंवीण | ज्ञाने.२.३३.१९९ |
| ५१५४७. दशा | कां अस्तमानीं निशी । जैसी सूर्यतेजातें ग्रासी । तैसी दशा स्मृतिभ्रंशीं । प्राणियांसी | ज्ञाने.२.६२-६३.३२४ |
| ५१५४८. दशा | चैतन्याचां भ्रंशीं । शरीरा दशा जैशी । तैशी पुरुषा बुद्धिनाशीं । होय देखें | ज्ञाने.२.६२-६३.३२८ |
| ५१५४९. दशा | आणि भक्तांही तेचि दशा । तरी भक्तीचा सोसु कायसा । म्हणऊनि हा ध्वनी ऐसा । न वाखाणावा | ज्ञाने.८.१४-१५.१२९ |
| ५१५५०. दशा | येरां सुरगणांची नवाई । विशेष सांगावी येथ काई । मुदला इंद्राचीचि दशा पाहीं । जे दिहाचे चौदा | ज्ञाने.८.१७.१५८ |
| ५१५५१. दशा | हां गा हातींचें जे वेळीं जाये । ते वेळीं आणिका लाभाची गोठी कें आहे । म्हणऊनि प्रयाणीं तंव होये । येतुली दशा | ज्ञाने.८.२५.२३२ |
| ५१५५२. दशा | तैसें ज्ञान जैं सांडूनि जाये । तैं ऐसी हे दशा आहे । म्हणोनि कीजे तें केलें नोहे । ज्ञानेंवीण | ज्ञाने.९.१९.३०५ |
| ५१५५३. दशा | मग माझी नित्य शांती । तया दशा तेचि कांती । किंबहुना जिती । माझेनि जीवें | ज्ञाने.९.३१.४२९ |
| ५१५५४. दशा | आजि आयुष्या उजवण जाहली । माझिया दैवा दशा उदयली । जे वाक्यकृपा लाधली । दैविकेनि मुखें | ज्ञाने.१०.११.१४७ |
| ५१५५५. दशा | तया विश्वरूपायेवढी दशा । करितां प्रीतीचा वाढु कैसा । शेल दिधलीसे उपदेशा । किरीटीसि देवें | ज्ञाने.११.५०.६४३ |
| ५१५५६. दशा | वायां मन हें नांव । एऱ्हवीं कल्पनाचि सावेव । जयाचेनि संगें जीव- । दशा वस्तू | ज्ञाने.१३.५-६.११० |
| ५१५५७. दशा | पैं स्थैर्य ऐसी भाष । बोलिजे जे सविशेष । ते हे दशा गा देख । देखणेया | ज्ञाने.१३.७.४९९ |
| ५१५५८. दशा | वोढाळाचां खुरीं । आखरु आतें बुरी । ते दशा माझां शिरीं । पावेल गा | ज्ञाने.१३.८.५५८ |
| ५१५५९. दशा | तेव्हां ऐसी दशा येईल पुढें । तैं मन होईल वेडें । तंव चिंतूनि ठेवी चोखडें । आत्मज्ञान | ज्ञाने.१३.८.५८० |
| ५१५६०. दशा | या देहाची हे दशा । आणि आत्मा तो एथ ऐसा । पैं नित्य सिद्ध आपैसा । अनादिपणें | ज्ञाने.१३.३१.११०६ |
| ५१५६१. दशा | ऐसी कोण्ही एकी दशा । तिये वादु अज्ञान ऐसा । तया गुंडलिया प्रकाशा । क्षेत्रज्ञु नांव | ज्ञाने.१४.३.७९ |
| ५१५६२. दशा | किंबहुना ऐसी दशा । तें ब्रह्मत्व गा सुदंशा । हें तो पावे जो ऐसा । मातें भजे | ज्ञाने.१४.२६.३९७ |
| ५१५६३. दशा | पैं विश्व घेऊनि गेला मार्गेसीं । तया चोरातें कवण कें गिवसी । जे कोणी एकी दशा ऐसी । शुद्ध ते मी | ज्ञाने.१५.१५.४४१ |
| ५१५६४. दशा | पैं आटोनि गेलिया सागरु । मग तरंगु ना नीरु । तया ऐशी अनाकारु । जे दशा गा | ज्ञाने.१५.१६.५०६ |
| ५१५६५. दशा | जया देवाची पाहतां थोरी । विश्व परमाणुही दशा न धरी । तो भावाचिये सरोभरी । नव्हेचि काई | ज्ञाने.१६.३८ |
| ५१५६६. दशा | तैसें पापपुण्याचें खिचटें । करोनि खातां बुद्धिचेष्टे । कडु महुर न वाटे । ऐसी जे दशा | ज्ञाने.१६.४.२५१ |
| ५१५६७. दशा | आणि शरीरा हन मानसा । बळाचा पैं कुवासा । हा आहारु तरी दशा । कैंची रोगां | ज्ञाने.१७.८.१३४ |
| ५१५६८. दशा | काय बहु बोलों अर्जुना । जैं हे दशा ये मना । तैं मनस्तपोभिधाना । पात्र होय ती | ज्ञाने.१७.१६.२३६ |
| ५१५६९. दशा | वार्षिया क्षोभे गगन । वसंतें दुणावे वन । देहा शृंगारी यौवन- । दशा जैसी | ज्ञाने.१८.२.११२ |
| ५१५७०. दशा | तैसें आपुलें नेणणें । फेडी जे का जाणणें । तेंही गिळूनि असणें । ऐसी जे दशा | ज्ञाने.१८.४९.९८२ |

| | | |
|---|---|---|
| ५१५७१. दशा | मग वैराग्याची गोंधळुक । जे ज्ञानाभ्यासाचें वार्धक्य । योगफळाचाही परिपाक । दशा जे कां | ज्ञाने.१८.५३.१०८५ |
| ५१५७२. दशा | मग देखिजे ना न देखिजे । ऐसी जे दशा निपजे । ते तें दर्शन माझें । साचोकारें | ज्ञाने.१८.५५.११६३ |
| ५१५७३. दशा | हे देखोनि तयाची दशा । मग करीचि ना सरिसा । परी सुखें जाला पिसा । बोलतसे | ज्ञाने.१८.७३.१५८५ |
| ५१५७४. दशी | आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे । कां दशी दीपसंगें । दीपुचि होय | ज्ञाने.१७.१९ |
| ५१५७५. दशे | तैसें भूतजात सर्व । माझेचि कीर अवयव । परि मायायोगें जीव- । दशे आले | ज्ञाने.७.१३.६६ |
| ५१५७६. दशे | आणि जागतिये दशे । स्वप्न लपालें असे । नातरी अंवसे । चंद्र गूढु | ज्ञाने.१३.५-६.७७ |
| ५१५७७. दशे | कां बीजमुद्रेआंतु । थोके तरु समस्तु । कां वस्त्रपण तंतु- । दशे राहे | ज्ञाने.१३.५-६.९५ |
| ५१५७८. दशे | अगा क्षीराचिये दशे । घृत क्षीराकारें असे । परि क्षीरचि नोहे जैसें । कपिध्वजा | ज्ञाने.१३.१४.९०१ |
| ५१५७९. दशे | अक्रोधत्व ऐसें । नांव तें ये दशे । जाण श्रीनिवासें । म्हणितलें तया | ज्ञाने.१६.२.१३० |
| ५१५८०. दशे | तैसें ज्ञातेपणें जें असे । तें ये कर्ता ऐसिये दशे । जेवितें बैसलें जैसें । रंधन करूं | ज्ञाने.१८.१८.४९१ |
| ५१५८१. दशेची | तैशी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां । बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें | ज्ञाने.६.४२-४३.४५३ |
| ५१५८२. दशेची | आत्मबोधप्रशस्ती । हे तिये दशेची ख्याती । ते भोगीतसे महामती । योग्यु तो गा | ज्ञाने.१८.५४.१०९५ |
| ५१५८३. दशेतें | आतां ऐक क्षेत्रज्ञु येणें । नामें जयातें बोलणें । जग जीवु कां म्हणे । जिये दशेतें | ज्ञाने.१५.१६.४९४ |
| ५१५८४. दशोपनिषदें | उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें । तियें कुसुमें मुगुटीं सुगंधें । शोभती भलीं | ज्ञाने.१.१८ |
| ५१५८५. दहनपचनसिद्धी | आणि दहनपचनसिद्धी । करीतसे जे निरवधी । ते हुताशीं तेजोवृद्धी । माझीचि गा | ज्ञाने.१५.१२.४०० |
| ५१५८६. दहावें | आकाशें सर्वत्र वसावें । वायूनें नावभरी उगें नसावें । पावकें दहावें । वर्षावें जळें | ज्ञाने.९.१८.२८१ |
| ५१५८७. दहाही | कां दहाही इंद्रियें आहाती । इयें जरी एकेंचि देहींचीं होती । आणि इहीं सेविले विषयो जाती । एकाचि ठाया | ज्ञाने.९.२३.३४७ |
| ५१५८८. दहिंयाचेनि | नाना दहिंयाचेनि मिसें । परिणमे दूधचि जैसें । कां मूर्त होय ऊंसें । गोडी जेवीं | ज्ञाने.१४.१९.२८२ |
| ५१५८९. दहीं | तेथ समविषम न दिसे कांहीं । म्हणोनि भूतें हे भाष नाहीं । जेविं दूधचि जाहालिया दहीं । नामरूप जाय | ज्ञाने.८.२०.१७० |
| ५१५९०. दहीं | माझेया विस्तारलेपणा नांवें । हें जगचि नोहे आघवें । जैसें दूध मुरालें स्वभावें । तरि तेंचि दहीं | ज्ञाने.९.४.६४ |
| ५१५९१. दहीं | अगा हिंव जें आकर्षलें । तेंचि हिमवंत जेवीं जालें । नाना दूध मुरालें । तेंचि दहीं | ज्ञाने.१४.२६.३७६ |
| ५१५९२. दांग | मग काळकूटकल्लोळीं कवळिलें । नाना महाविजूंचे दांग उमटले । तैसे अपार कर देखिले । उदितायुधीं | ज्ञाने.११.१०.२१७ |
| ५१५९३. दांग | महाकल्पाचां शेवटीं । उदेलिया उमळती सृष्टी । तैसेंचि आणिखीचें दांग उठी । सासिन्नलें | ज्ञाने.१५.१.१२६ |
| ५१५९४. दांग | अगा काढूनि भ्रांतीचें दांग । उभवी सृष्टीचें आंग । हें असो बहु जग । जया नाम | ज्ञाने.१५.१६.४८३ |
| ५१५९५. दांग | संवचोरमैत्री चांग । जंव न पविजे तें दांग । सामान्या भली आंग । न शिवे तंव | ज्ञाने.१८.१२.२५० |
| ५१५९६. दांगा- | तरावया मृगजळाची गंगा । डोणीलागीं धांवतां दांगा- । माजीं वोहळें बुडिजे पैं गा । साच जेवीं | ज्ञाने.१५.३.२५२ |
| ५१५९७. दांगाणे | मग म्लेंच्छांचे वसौटे । दांगाणे हन कैकटे । का शिबिरें चोहटे । नगरींचे ते | ज्ञाने.१७.२२.२९४ |

| ५१५९८. दांगीं | तरी आपैसीं दांगीं डोंगर । झाडालि विति असार । तैसें लांबे राजागर । नुठिती ते | ज्ञाने.१८.१.९४ |
|---|---|---|
| ५१५९९. दांगीचें | संकल्पेंवीण स्वप्न । न लावितां दांगीचें बन । न रचितां गंधर्वभुवन । उठी जैसें | ज्ञाने.१८.१७.४२९ |
| ५१६००. दांगें | देवा मंदराचेनि अंगलगें । ठायीं ठायीं श्वापदांचीं दांगें । तैसीं इयें तुझां देहीं अनेगें । देखतसें भुवनें | ज्ञाने.११.१५.२५७ |
| ५१६०१. दांगें | जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांतफुणगे । दीपले जाळिती दांगें । संसाराचीं | ज्ञाने.१६.८ |
| ५१६०२. दांडी | जो माथांचि पालाणवी । अंगा अवगुण घालवी । जीवें दांडी घेववी । ममत्वाची | ज्ञाने.१८.५३.१०६३ |
| ५१६०३. दांडेयाचे | तैसा कर्मीं शिणे एकीं । कीं विसांवों पाहे आणिकीं । दांडेयाचे घाय बुकी । धाडणें जैसें | ज्ञाने.१८.११.२३१ |
| ५१६०४. दांडेवरी | तेणें भूतें भांबावलीं । म्हणोनि संसाराचिया आडवामाजीं पडिलीं । मग महादु:खाचां घेतलीं । दांडेवरी | ज्ञाने.७.२७.१७१ |
| ५१६०५. दांड्याचे | अकुळस्त्री दांड्याचे घाये । परघर रिगालीहि जरी साहे । तरी स्वपतीतें वायें । सांडिलें कीं | ज्ञाने.१८.४८.९४४ |
| ५१६०६. दांत | एकां उभयांचि प्राण गेले । चांगांचे दांत बैसले । बिरुदांचे दादुले । हिंवताती | ज्ञाने.१.१३.१३५ |
| ५१६०७. दांत | वणिवेनि पेटले पर्वत । कवळूनि ज्वाळांचे उभड उठत । तैसी चाटीत दाढा दांत । जीभ लोळे | ज्ञाने.११.१९.३१३ |
| ५१६०८. दांत | तैसीं जियेतियेकडे । तुझीं वक्त्रें जीं प्रचंडें । न समाती दरीमाजीं सिंहाडें । तैसें दांत दिसती रागीट | ज्ञाने.११.२३.३४४ |
| ५१६०९. दांत | जयाचिये आंगींची दीप्ती येवढी । जे त्रैलोक्य कीजे राखोंडी । कीं तयाही तोंडें आणि तोंडीं । दांत दाढा | ज्ञाने.११.२४.३५६ |
| ५१६१०. दांत | चतुरंगा परिवारा । संजोडियां रहंवरां । दांत न लाविसी मा परमेश्वरा । कैसा तुष्टलासि बरवा | ज्ञाने.११.२६.३९७ |
| ५१६११. दांत | तांबूल ओठ राऊं । हांसतां दांत दाऊं । सनागर मिरऊं । बोल जेणें | ज्ञाने.१३.८.५६३ |
| ५१६१२. दांतदाढांची | असो दांतदाढांची दाटी । न झांकवे मा दोंदों वोठीं । सैंघ प्रळयशस्त्रांचिया दाट कांटी । लागलिया जैशा | ज्ञाने.११.२५.३७६ |
| ५१६१३. दांतही | दांतही आन होती । परि अपाडें सानेजती । जैसी दुबाहीं बैसे पांती । हिरेयांची | ज्ञाने.६.१४.२६३ |
| ५१६१४. दांतां | परस्परें दांतां । आदळु होय खातां । तो गा तोंडीं घेतां । तोषों लागे | ज्ञाने.१७.९.१४५ |
| ५१६१५. दांतांचिये | तिये रत्नें दांतांचिये सवडी । कूट लागलें जिभेचां बुडीं । कांहीं कांहीं आगरडीं । दंष्ट्रांचीं माखलीं | ज्ञाने.११.२७.४१६ |
| ५१६१६. दांतांचे | पैं मोहाचेनि सांगडें । लासी पिलें धरी तोंडें । तेथ दांतांचे आगरडे । लागती जैसे | ज्ञाने.१३.७.२५१ |
| ५१६१७. दाऊं | यालागीं एकिहेळां तुज । दाऊं आतां वर्म निज । सर्वभूतांकुरें बीज । विरूढत असे तें मी | ज्ञाने.१०.३९-४०.३०४ |
| ५१६१८. दाऊं | हां हो उटोनियां आरिसा । आंधळिया दाऊं बैसा । बहिरीयापुढें हृषीकेशा । गाणीव करा | ज्ञाने.११.८.१५७ |
| ५१६१९. दाऊं | तांबूल ओठ राऊं । हांसतां दांत दाऊं । सनागर मिरऊं । बोल जेणें | ज्ञाने.१३.८.५६३ |
| ५१६२०. दाऊं | व्याधि लागलिया माणुसा । नये भोग दाऊं जैसा । निकें न साहे जो तैसा । पुढिलांचें | ज्ञाने.१३.११.७१८ |
| ५१६२१. दाऊं | तो कृष्णार्जुनसंवादु । नागरीं बोलीं विशदु । सांगोनि दाऊं प्रबंधु । वोवियेचा | ज्ञाने.१३.३४.११५४ |
| ५१६२२. दाऊं | दाऊं वेल्हाळे देशी नवी । जे साहित्यातें वोजावी । अमृतातें चुकी ठेवी । गोडिसेपणें | ज्ञाने.१३.३४.११५६ |
| ५१६२३. दाऊं | आणि एकसरें आहारा । कैसेनि तिनी मोहरा । जालिया तेही वीरा । रोकडें दाऊं | ज्ञाने.१७.७.१२० |
| ५१६२४. दाऊं | येथ तप म्हणिजे काई । तें स्वरूप दाऊं पाहीं । मग भेदिलें गुणीं तिहीं । तें पाठीं बोलों | ज्ञाने.१७.१३.१९९ |

| ५१६२५. दाऊं | आणि हाही बोलोनि भावो । तुज दाऊं आम्ही भिवों । जे रुसतां बांधे थांवो । तें प्रेम गा हें | ज्ञाने.१८.१३.२९४ |
|---|---|---|
| ५१६२६. दाऊं | आतां हेचि खाणी वाढे । मग कर्माची सृष्टि घडे । जिहीं ते हेतुही उघडे । दाऊं पांचै | ज्ञाने.१८.१४.३५३ |
| ५१६२७. दाऊनि | पिंडें पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतींचा दंशु । परि दाऊनि गेला उद्देशु । महाविष्णु | ज्ञाने.६.१४.२९१ |
| ५१६२८. दाऊनि | तैसीं इयें नाना देहें । दाऊनि मी नाना होयें । तेथ ऐसा बंधु आहे । तेंही देखें | ज्ञाने.१४.४.१३४ |
| ५१६२९. दाऊनि | मी दाऊनि गुण देखे । गुणता हे मियां पोखे । ययाचेनि नि:शेखें । उरे तें मी | ज्ञाने.१४.१९.२९८ |
| ५१६३०. दाऊनि | कां वस्त्रपणाचेनि आरोपें । मूर्खाप्रति तंतु हारपे । नाना मुग्धा पटु लोपे । दाऊनि चित्र | ज्ञाने.१८.२१.५४४ |
| ५१६३१. दाऊनि | जे नेणणें माझें प्रकाशूनि । अन्यथात्वें मातें दाऊनि । सर्वही सर्वीं भजौनि । बुझावीतसे | ज्ञाने.१८.५४.१११४ |
| ५१६३२. दाऊनियां | प्रथमीं अर्जुनाचा विषादु । दुजीं बोलिला योगु विशदु । परि सांख्यबुद्धीसि भेदु । दाऊनियां | ज्ञाने.१०.२४ |
| ५१६३३. दाखऊं | अर्जुना गा जाण । ययां नाम गुण । आतां दाखऊं खूण । बांधिती ते | ज्ञाने.१४.५.१४४ |
| ५१६३४. दाखऊं | तियेंचि कर्मादिकें तिन्हीं । कांडें कोणकोणे स्थानीं । गीते आहाति तें नयनीं । दाखऊं आईक | ज्ञाने.१८.६६.१४३४ |
| ५१६३५. दाखवणें | हें रूप दाखवणें देवराया । कीं मज अपत्या चुकलिया । बुझावोनि तुवां माया । स्तनपान दिधलें | ज्ञाने.११.५१.६६८ |
| ५१६३६. दाखवावयालागीं | तो विश्वतोमुख स्वभावें । आणि तेंचि दाखवावयालागीं पांडवें । प्रार्थिला आतां आघवें । होऊनि ठेला | ज्ञाने.११.११.२३३ |
| ५१६३७. दाखविजे | परि तोचि योगु बापा । एके परी आहे सोपा । जरी पुत्रशोकु संकल्पा । दाखविजे | ज्ञाने.६.२४.३७५ |
| ५१६३८. दाखविती | म्हणोनि मियां जें विनविलें कांहीं । तें देव न दाखविती हें कीर नाहीं । परि देखावयालागीं देईं । पात्रता मज | ज्ञाने.११.४.११० |
| ५१६३९. दाखविला | जिज्ञासुपुढां वीरेशा । हेचि होऊनि जिज्ञासा । मी कां जिज्ञास्यु ऐसा । दाखविला | ज्ञाने.१८.५४.१११९ |
| ५१६४०. दाखविलिया | इंद्रियवर्गें दाखविलिया । विरुद्धा अथवा भलीया । विस्मयो कांहीं केलिया । नुठी चित्तीं | ज्ञाने.१६.१.७८ |
| ५१६४१. दाखविलें | जे मी मारिता हे कौरव मरते । ऐसेनि वेंटाळिला होता मोहें बहुतें । तो फेडावयालागीं अनंतें । हें दाखविलें निज | ज्ञाने.११.२६.४०७ |
| ५१६४२. दाट | बहुतकरूनि नि:शब्द । दाट न रिगे श्वापद । शुक हन षट्पद । तेउतें नाहीं | ज्ञाने.६.११.१७६ |
| ५१६४३. दाट | पैं हिंवराची दाट साउली । सज्जनीं जैसी वाळिली । तैसीं पुण्यें डावलूनि गेलीं । अभक्तांतें | ज्ञाने.९.३१.४३७ |
| ५१६४४. दाट | असो दांतदाढांची दाटी । न झांकवे मा दोंदों वोठीं । सैंघ प्रळयशस्त्रांचिया दाट कांटी । लागलिया जैशा | ज्ञाने.११.२५.३७६ |
| ५१६४५. दाट | माजीं वेदांचा पाला दाट । तो करी सुविद्येचा झडझडाट । जंव वाजे अचाट । सत्त्वानिळु तो | ज्ञाने.१५.२.१९२ |
| ५१६४६. दाटणी | नाना चराचरीं भूतीं । दाटणी नव्हे क्षिती । तैसा नाना द्वंद्वीं प्राप्तीं । घामेजेना | ज्ञाने.१३.७.३४८ |
| ५१६४७. दाटणी | म्हणौनि अद्वयबोधपाटणीं । तेथ महानंदाची दाटणी । मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं । मंदावों लागती | ज्ञाने.१६.१२ |
| ५१६४८. दाटणें | पैं शिळा कां सिदोरिया । दाटणें एक धनंजया । परी जें वाहतां विसांवया । मिळिजे तें घेपे | ज्ञाने.१८.४८.९३८ |
| ५१६४९. दाटत | जे द्वेषाचां आवर्तीं दाटत । मत्सराचे वळसे पडत । माजी प्रमदादि तळपत । महामीन | ज्ञाने.७.१४.७२ |
| ५१६५०. दाटत | आणि शोकाचां कडा उपडत । क्रोधाचां आवर्तीं दाटत । आपदागिधीं चुंबिजत । उधवलां ठायीं | ज्ञाने.७.१४.८७ |
| ५१६५१. दाटती | तंव विचाराचिया रसना न दाटती । परी हेतूचांहि दशनीं न फुटती । ऐसें जाणोनि सुभद्रापती । चुंबीचिना | ज्ञाने.७.३०.१९३ |

| | | |
|---|---|---|
| ५१६५२. दाटती | अज्ञानाचिये राती- । माजीं तमाची मिळणी दाटती । ते नाशूनि घालीं परौती । करीं नित्योदयो | ज्ञाने.१०.११.१४३ |
| ५१६५३. दाटपणें | मज एकासनीं बैसणें । कां तुझा बोलु न मानणें । हें वोळखीचेनि दाटपणें । बहुत घडलें | ज्ञाने.११.४२.५५४ |
| ५१६५४. दाटपणें | रात्री देवो नेणे । थोडें बहु न म्हणे । म्हणियाचेनि दाटपणें । साजा होय | ज्ञाने.१३.७.४३८ |
| ५१६५५. दाटला | तैं गजबजों लागे कैसा । व्याधें रुंधला मृगु जैसा । कां बाहीं तरतां वळसां । दाटला जेवीं | ज्ञाने.१३.७.१८६ |
| ५१६५६. दाटलाही | नाना पथ्येंसीं औषध लाहे । तरी रोगें दाटलाही जिये । कां मीना जिव्हाळा होये । जळाचा जरी | ज्ञाने.१८.३०.७०६ |
| ५१६५७. दाटलिया | अंगावरी पडतां पाषाण । न सुवावें केविं वोडण । रोगें दाटलिया आणि उदासपण । वोखदेंसीं | ज्ञाने.९.३३.४९१ |
| ५१६५८. दाटलिया | शिवतला चंद्रकरीं । सोमकांतु द्रावो धरी । तैसिया स्वेदकणिका शरीरीं । दाटलिया | ज्ञाने.११.१४.२४८ |
| ५१६५९. दाटलीं | कुळवाडी रिणें दाटलीं । कां वांकडिया ढोरें बैसली । तैसी नुठील कांहीं केली । जीभचि हे | ज्ञाने.१३.८.५६५ |
| ५१६६०. दाटली | तैसी सुबद्ध आटली । पुटीं होती दाटली । तें वज्रासनें चिमुटली । सावध होय | ज्ञाने.६.१४.२२५ |
| ५१६६१. दाटली | प्राकृताही तरी रुखा । जे फळें दाटली होय शाखा । ते वोवांडली देखा । बुडासि ये | ज्ञाने.१५.२.२०१ |
| ५१६६२. दाटलें | आणि आकाश हें आकाशें । दाटलें न ढळे जैसें । मिया आत्मेन आपणपें तैसें । जालें तया | ज्ञाने.१८.५५.११६५ |
| ५१६६३. दाटिजे | देखें पुढिलाचें वोझें । जरी आपुलां माथां घेईजे । तरी सांगे कां न दाटिजे । धनुर्धरा | ज्ञाने.३.२७.१७७ |
| ५१६६४. दाटिजे | स्थळीं नावा जिया दाटिजे । जळीं तियांचि जेवीं तरिजे । तेवीं बंधकीं कर्मीं सुटिजे । नामें येणें | ज्ञाने.१७.२४.३६६ |
| ५१६६५. दाटिजो | मग मेरूपासूनि थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें । दाटिजो पां परि भारें । चित्त न दटे | ज्ञाने.६.२२.३६९ |
| ५१६६६. दाटिला | तो उपशमें निहटिला । धैर्यें वरी दाटिला । गुरुवाक्यें काढिला । बळकटपणें | ज्ञाने.४.२७.१३२ |
| ५१६६७. दाटिली | ना हें नावडोनि कांहीं । कामादिकांचांचि ठायीं । दाटिली जेणें डोई । आत्मचोरें | ज्ञाने.१६.२३.४४५ |
| ५१६६८. दाटिले | तंव धारणावारू दाटिले । महाभूतांतें एकवटिलें । मग चतुरंग सैन्य निवटिलें । संकल्पाचें | ज्ञाने.९.१४.२१६ |
| ५१६६९. दाटी | पाहें पां पूर्णचंद्राचिये भेटी । समुद्र भरतें अपार दाटी । तेथ चंद्रासि काय किरीटी । उपखा पडे | ज्ञाने.९.८.११५ |
| ५१६७०. दाटी | असो दांतदाढांची दाटी । न झांकवे मा दोंदों वोठीं । सैंघ प्रळयशस्त्रांचिया दाट कांटी । लागलिया जैशा | ज्ञाने.११.२५.३७६ |
| ५१६७१. दाटी | आणि जेणें जेणें कडे । दोष सूतील तोंडें । तयां कर्मरंध्रां गुंडे । नियमाचे दाटी | ज्ञाने.१३.८.५९० |
| ५१६७२. दाटी | विविधा औत्सुक्यांची दाटी । चीप आतती होती कंठीं । ते करुनियां पैठी । हृदयामाजीं | ज्ञाने.१८.७२.१५५६ |
| ५१६७३. दाटी- | तेथेंचि कृष्णमेघाचिया दाटी- । माजीं कल्पांत विजूंचिया स्फुटी । तैसिया वन्हि पिंगळा दिठी । भ्रूभंगातळी | ज्ञाने.११.१०.२०४ |
| ५१६७४. दाटीचिना | ऐसा असोनि इये शरीरीं । कोण नित्यबुद्धीची सुरी । अनित्यभावाचां उदरीं । दाटीचिना | ज्ञाने.१३.२८.१०७० |
| ५१६७५. दाटुगा | बाहेरी धीट जैसी । दाटुगा पति कळासी । करी टेहणी तैसी । प्रवृत्तीसीं | ज्ञाने.१३.७.५०५ |
| ५१६७६. दाटुगी | जे गीता येणें नांवें नावाणिगी । जे अविद्या जिणोनि दाटुगी । ते कीर्ती तुझी आम्हांजोगी । वानावया जाली | ज्ञाने.१६.३५ |
| ५१६७७. दाटुगी | इहींच साही दोषांगीं । हे आसुरी संपत्ति दाटुगी । जैसें थोर विषय सुभगे अंगीं । अंग सानें | ज्ञाने.१६.४.२५३ |
| ५१६७८. दाटुगी | कां पापियां नरकभोगीं । सुवावयालागीं जगीं । पातकांची दाटुगी । सभाचि हे | ज्ञाने.१६.२१.४२७ |

| | | |
|---|---|---|
| ५१६७९. दाटुगें | तयाचेनि आंगलगें । अज्ञान जगीं दाटुगें । जें सज्ञानाही संगें । झोंबों सके | ज्ञाने.१३.११.७७९ |
| ५१६८०. दाटूनि | दिठीचि पाहतां निविजे । कां तोंड भरोनि बोलिजे । नातरी दाटूनि खेंव दीजे । ऐसें कोण आहे | ज्ञाने.६.१०.११७ |
| ५१६८१. दाटे | मग कंठनाळ आटे । हनुवटी हे हडौती दाटे । ते गाढी होवोनि नेहटे । वक्ष:स्थळीं | ज्ञाने.६.१३.२०७ |
| ५१६८२. दाटे | जरी चोरां सभा दाटे । अथवा मीना गळु घोटे । ना तरी भेडा उलटे । विवसी जरी | ज्ञाने.७.१४.९४ |
| ५१६८३. दाटे | जैसें चंद्राआड आभाळ । सदट दाटे सजळ । मग गडद ना उजाळ । ऐसें झांवळें होय | ज्ञाने.८.२५.२२९ |
| ५१६८४. दाटे | समुद्रीं दाटे भरितें । तैं समुद्रचि भरी तरियांतें । तैसें स्वसंपत्ती चित्तें । इंद्रियां केलें | ज्ञाने.१३.७.३०६ |
| ५१६८५. दाटे | तया सिंधू भरितें दाटे । सोमकांता पाझरु फुटे । कुमुदांचकोरांचा फिटे । संकोचु तो | ज्ञाने.१८.६१.१३१३ |
| ५१६८६. दाटें | जेथ अमृताचेनि पाडें । मुळेंहीसकट गोडें । जोडती दाटें झाडें । सदा फळतीं | ज्ञाने.६.११.१७३ |
| ५१६८७. दाटें | कणेंविण सोपटें । कणसें लागलीं आथी एक दाटें । काय करावें गोमटें । वोस नगर | ज्ञाने.९.३१.४३३ |
| ५१६८८. दाटैल | तें देवाचें मनोगत । दावित आहासी तूं मूर्त । हेंहीं म्हणतां चित्त । दाटैल तुझें | ज्ञाने.१३.११.८५६ |
| ५१६८९. दाटोनि | म्हणौनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटोनि गाडोरा । वरी गुरुभक्तीचा पुरा । प्रासादु जो जाला | ज्ञाने.१८.६७.१५०७ |
| ५१६९०. दाढा | जेथ द्वेषाचिया दाढा । खसखसां ज्ञानाचा करिती रगडा । जे अगस्तीगवसणी मूढां । स्थूलबुद्धि | ज्ञाने.९.१२.१८३ |
| ५१६९१. दाढा | वणिवेनि पेटले पर्वत । कवळूनि ज्वाळांचे उभड उठत । तैसी चाटीत दाढा दांत । जीभ लोळे | ज्ञाने.११.१९.३१३ |
| ५१६९२. दाढा | जैसें काळरात्रीचेनि अंधारें । उल्हासत निघती संहारखेचरें । तैसिया वदनीं प्रळयरुधिरें । काटलिया दाढा | ज्ञाने.११.२३.३४५ |
| ५१६९३. दाढा | जयाचिये आंगींची दीप्ती येवढी । जे त्रैलोक्य कीजे राखोंडी । कीं तयाही तोंडें आणि तोंडीं । दांत दाढा | ज्ञाने.११.२४.३५६ |
| ५१६९४. दाढा | तयाचि पाहे या तोंडा । येईल जळंबटाचा लोंढा । इया उमळती दाढा । दातांसींहि | ज्ञाने.१३.८.५६४ |
| ५१६९५. दाढांचां | परि सिसाळें मुकुटेंसीं । पडिलीं दाढांचां सांडसीं । पीठ होत कैसीं । दिसत आहाती | ज्ञाने.११.२७.४१५ |
| ५१६९६. दाढांचे | काढूनि प्रळयविजूंचीं जुंबाडें । जैसे पन्नासिले गगनाचे हुडे । तैसे आवाळुवांवरी आंकडे । धगधगीत दाढांचे | ज्ञाने.११.२४.३६३ |
| ५१६९७. दाढियेसी | कुसळें कोरडीं । वारेनि जाती बरडीं । तैसी आपत्य तोंडीं । दाढियेसी | ज्ञाने.१३.८.५६६ |
| ५१६९८. दाढी | दाढी साउळ धरी । मान हालौनि वारी । तरी जो करी । प्रीयेचा पैसु | ज्ञाने.१३.११.७५७ |
| ५१६९९. दाढे | काय सागराचा घोंटु भरावा । कीं पर्वताचा घांसु करावा । ब्रह्मकटाहो घालावा । आसकाचि दाढे | ज्ञाने.११.३०.४३० |
| ५१७००. दाणा | रावो जैसा स्वप्नीं । रंकपणें रिघे धानीं । तो दों दाणा मानी । इंद्रु ना मी | ज्ञाने.१४.६.१५४ |
| ५१७०१. दातयाचें | तैसें दिधलें दातयाचें । जो कोणेही आंगें नुमचे । अर्पिलया साम्य तयाचें । कीजे पैं गा | ज्ञाने.१७.२०.२८२ |
| ५१७०२. दाता | जे हे श्रवणें पाठें अर्थें । गीता नेदी मोक्षाआरौतें । जैसा समर्थ दाता कोणातें । नास्ति न म्हणे | ज्ञाने.१८.७८.१६९४ |
| ५१७०३. दातांसींहि | तयाचि पाहे या तोंडा । येईल जळंबटाचा लोंढा । इया उमळती दाढा । दातांसींहि | ज्ञाने.१३.८.५६४ |
| ५१७०४. दातारा | आणि मी तंव दातारा । कृपेचां ये रिघोनि गाभारां । घेत आहें चारा । ब्रह्मरसाचा | ज्ञाने.११.१.६७ |
| ५१७०५. दातारा | जेणें उरीं हाणितलासि पांपरा । तयाचा चरणु वाहासी दातारा । अझुनी वैरियांचिया कलेवरा । विसंबसीना | ज्ञाने.११.४.१०५ |

| | | |
|---|---|---|
| ७७९५०. माझें | अग्नि काष्ठें खाये । तें काष्ठचि अग्नि होये । तेवि मरतें मारितें पाहें । स्वरूप माझें | ज्ञाने.९.१९.२९७ |
| ७७९५१. माझें | यालागीं मृत्यूचां भागीं जें जें । तेंही पैं रूप माझें । आणि न मरतें तंव सहजें । अविनाश मी | ज्ञाने.९.१९.२९८ |
| ७७९५२. माझें | एऱ्हवीं तरी नरकींचें दुःख । पावोनि स्वर्गा नाम कीं सुख । वांचूनि नित्यानंद गा निर्दोष । तें स्वरूप माझें | ज्ञाने.९.२०.३१४ |
| ७७९५३. माझें | गंगेचें उदक गंगे जैसें । अर्पिजे देवपितरोद्देशें । माझें मज देती तैसें । परि आनानीं भावीं | ज्ञाने.९.२४.३५३ |
| ७७९५४. माझें | म्हणोनि तयाचिया चित्ता । माझी जवळिक पांडुसुता । तेव्हांचि तो तत्त्वता । स्वरूप माझें | ज्ञाने.९.३१.४२७ |
| ७७९५५. माझें | पाहें पां भक्तीचेनि आथिलेपणें । दैत्यीं देवां आणिलें उणें । माझें नृसिंहत्व लेणें । जयाचिये महिमें | ज्ञाने.९.३२.४५० |
| ७७९५६. माझें | पाहें पां वालभाचेनि व्याजें । तिया व्रजांगनांचीं निजें । मज मीनलिया काय माझें । स्वरूप नव्हतीचि | ज्ञाने.९.३२.४६५ |
| ७७९५७. माझें | अगा सोयरेपणेंचि पांडवा । माझें सायुज्य यादवां । कीं ममत्वें वसुदेवा- । दिकां सकळां | ज्ञाने.९.३२.४६७ |
| ७७९५८. माझें | तरि झडझडोनि वहिला निघ । इये भक्तीचिये वाटे लाग । जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें | ज्ञाने.९.३३.५१६ |
| ७७९५९. माझें | परि बाप भाग्य माझें । जे वृत्तांतु सांगावयाचेनि व्याजें । कैसा रक्षिलों मुनिराजें । श्रीव्यासदेवें | ज्ञाने.९.३४.५२५ |
| ७७९६०. माझें | अवचितयावरी सर्वस्व सांडिजे । चोख तरी तोचि भांडारी कीजे । तैसा तूं आतां माझें । निजधाम कीं | ज्ञाने.१०.१.५२ |
| ७७९६१. माझें | ऐकें ऐकें सुवर्म । वाक्य माझें परम । जें अक्षरें लेऊनि परब्रह्म । तुज खेंवासि आलें | ज्ञाने.१०.१.६२ |
| ७७९६२. माझें | तैसा राहोनि ठायठिके । स्वप्रकाशें चोखें । अजत्व माझें देखें । आपुलिये डोळां | ज्ञाने.१०.३.७४ |
| ७७९६३. माझें | आणि माझें जें जाणणें नेणणें । तें तंव भूतांचिया दैवाचें करणें । म्हणोनि भूतीं भावाचें होणें । विषम पडे | ज्ञाने.१०.४-५.८९ |
| ७७९६४. माझें | ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणें । नाही राती दिवो जाणणें । केलें माझें सुख अव्यंगवाणें । आपणपेयां जिहीं | ज्ञाने.१०.९.१२९ |
| ७७९६५. माझें | पैं गा भक्तासि माझें कोड । मज तयाचे अनन्यगतीची चाड । कां जे प्रेमळांचें सांकड । आमतें घरीं | ज्ञाने.१०.१०.१३७ |
| ७७९६६. माझें | मग दैवगत्या जरी सेविजे । तरी तें आपणचि होऊनि ठाकिजे । तें तुज देतां चित्त माझें । पुरें म्हणों न शके | ज्ञाने.१०.१८.१९९ |
| ७७९६७. माझें | ऐसें बहुवस आणि व्यापकपण । माझें विभूतियोगें जाण । तरी जीवचि करूनि श्रवण । आइकोनि आइक | ज्ञाने.१०.२०.२१९ |
| ७७९६८. माझें | तेवीं माझे विभूतिविशेष । जरी जाणों पाहिजेती अशेष । तरी स्वरूप एक निर्दोष । जाणिजे माझें | ज्ञाने.१०.३२-३३.२६२ |
| ७७९६९. माझें | गायत्रीछंद जें म्हणिजे । तें सकळा छंदांमाजि माझें । स्वरूप हें जाणिजे । निभ्रांत तुवां | ज्ञाने.१०.३५.२८२ |
| ७७९७०. माझें | हें काय कितीएक सांगावें । तुवांही देखिलें ऐकिलें असे आघवें । तरि यादवांमाजीं जाणावें । हेंचि स्वरूप माझें | ज्ञाने.१०.३६-३७.२९२ |
| ७७९७१. माझें | याचिलागीं माझें । विनविलें तें आइकिजे । तरी अवधान दीजे । सज्जनीं तुम्हीं | ज्ञाने.११.१५ |
| ७७९७२. माझें | ऐसें अगाध जें तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे । तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा | ज्ञाने.११.३.८६ |
| ७७९७३. माझें | काय जाहलें न वाहतां भुई पेरिजे । तरी तो वेळु विलया जाइजे । तरी आतां माझें निजरूप देखिजे । ते दृष्टी देवों तुज | ज्ञाने.११.८.१६२ |
| ७७९७४. माझें | हा योगियांचें समाधिधन । कीं होऊनि ठेलें पार्थाअधीन । यालागीं विस्मयो माझें मन । करीतसे राया | ज्ञाने.११.९.१७४ |
| ७७९७५. माझें | अहो देहो पार्थिव कीर जाये । ययाची काकुळती कवणा आहे । परि आतां चैतन्य माझें विपायें । वांचे कीं न वांचे | ज्ञाने.११.२४.३६७ |
| ७७९७६. माझें | ऐसें म्हणिजत आहे देवें । अर्जुना तुम्ही माझें हें जाणावें । येर जाण मी आघवें । सरलों ग्रासूं | ज्ञाने.११.३२.४५६ |

| | | |
|---|---|---|
| ७७९७७. माझें | तें हें विश्वरूप आपुलें । तुम्हीं मज डोळां दाविलें । तरि माझें मन झालें । हृष्ट देवा | ज्ञाने.११.४५.५८९ |
| ७७९७८. माझें | तें हें अपरांअपार । स्वरूप माझें परात्पर । एथूनि ते अवतार । कृष्णादिक | ज्ञाने.११.४७.६१४ |
| ७७९७९. माझें | कृष्णातें म्हणे अवधारिलें । आपण विश्वरूप मज दाविलें । तंव नवल म्हणोनि बिहालें । चित्त माझें | ज्ञाने.१२.१.२१ |
| ७७९८०. माझें | ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर । ध्यानमिषें घर । माझें झालें | ज्ञाने.१२.६.८० |
| ७७९८१. माझें | तैसे ते माझें । कलत्र हें जाणिजे । कायिसेनिही न लाजें । तयांचेनि मी | ज्ञाने.१२.७.८६ |
| ७७९८२. माझें | मग जें जें कां निमिख । देखेल माझें सुख । तेतुलें अरोचक । विषयीं घेईल | ज्ञाने.१२.९.१०६ |
| ७७९८३. माझें | आणि मी तूं हे भाष नेणे । माझें कांहींचि न म्हणे । सुखदु:ख जाणणें । नाहीं जया | ज्ञाने.१२.१३.१४९ |
| ७७९८४. माझें | हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला | ज्ञाने.१२.१९.२१३ |
| ७७९८५. माझें | माझें असतेपण लोपो । नांवरूप हारपो । मज झणें वासिपो । भूतजात | ज्ञाने.१३.७.१९७ |
| ७७९८६. माझें | आणि माझें तंव आघवें । ग्रथन येणेंचि भावें । जे तुम्हीं संतीं होआवें । सन्मुख सदा | ज्ञाने.१३.७.३२८ |
| ७७९८७. माझें | देखे अक्षमें कुब्जें । कीं विटावूं लागे फुंजें । परि न म्हणे पाहे माझें । हेचि भवे | ज्ञाने.१३.११.७६० |
| ७७९८८. माझें | नीच आराधन माझें । काजीं कुळदेवता भजे । पर्वविशेषें कीजे । पूजा आना | ज्ञाने.१३.११.८१५ |
| ७७९८९. माझें | माझें अधिष्ठान घरीं । आणि वोवसे आनाचे करी । पितृकार्यावसरीं । पितरांचा होय | ज्ञाने.१३.११.८१६ |
| ७७९९०. माझें | जी गीतार्थनिधान । काढू माझें मन । सुयीं स्नेहांजन । आपलें तूं | ज्ञाने.१४.१९ |
| ७७९९१. माझें | मग तें देहाचें बेळें । वोलांडूनि एकेचि वेळे । संवतुकी कांटाळें । माझें जाले | ज्ञाने.१४.१.५१ |
| ७७९९२. माझें | बंधु कां न बंधिजे । हें जाणणें मज माझें । नेणणेनि उपजे । आपलेनि | ज्ञाने.१४.४.१३५ |
| ७७९९३. माझें | म्हणे भाग्य ना माझें । आजि सुखियें नाहीं दुजें । विकाराष्टकें फुंजे । सात्त्विकाचेनि | ज्ञाने.१४.६.१५१ |
| ७७९९४. माझें | आणि म्हणे आजि आन । मीवांचूनि नाहीं सज्ञान । चातुर्यचंद्रा गगन । चित्त माझें | ज्ञाने.१४.६.१५७ |
| ७७९९५. माझें | माझें पैलपण जाये । भक्त हें ऐलपण ठाये । अनादि ऐक्य जें आहे । तेंचि निवडे | ज्ञाने.१४.२६.३९५ |
| ७७९९६. माझें | परी माझें आराधन । ब्रह्मत्वीं होय सोपान । येथ मी हन साधन । गमेन हो | ज्ञाने.१४.२६.४०२ |
| ७७९९७. माझें | तैसें श्रीनिवृत्तिराजें ।अज्ञानपण हें माझें । आणिलें वोजे । ज्ञानाचिया | ज्ञाने.१५.२६ |
| ७७९९८. माझें | तैसा जिये वस्तूचां ठायीं । कोण्हीच कां आभासु नाहीं । तें माझें निजधाम पाहीं । पाटाचें गा | ज्ञाने.१५.६.३१६ |
| ७७९९९. माझें | तैसें अनादिपण न मोडे । माझें अक्रियत्व न खंडे। परी कर्ता भोक्ता ऐसें आवडे । ते जाण गा भ्रांती | ज्ञाने.१५.७.३५० |
| ७८०००. माझें | नाना बीजधर्मानुरूप । झाडीं उपजवी आप । तैसें परिणमलें स्वरूप । माझें जीवां | ज्ञाने.१५.१४.४१८ |
| ७८००१. माझें | जें अद्वैतावरीही भोगिजे । तें अनुभवींचें तूं विरजें । पुसोनि मज माझें । देतासि सुख | ज्ञाने.१५.१५.४५० |
| ७८००२. माझें | पैं दोहीं वोठीं एक बोलणें । दोहीं चरणीं एक चालणें । तैसें पुसणें सांगणें । तुझें माझें | ज्ञाने.१५.१५.४५४ |
| ७८००३. माझें | हा जनकु हे माता । हा मी गौर हीन पुरता । पुत्र वित्त कांता । माझें हें ना | ज्ञाने.१५.१६.४९२ |

| | | |
|---|---|---|
| ७८००४. माझें | परी तुजपुढां सांगितलें । तें अर्जुना ऐसें जालें । जें गौप्यधन काढिलें । माझें आजि | ज्ञाने.१५.२०.५७७ |
| ७८००५. माझें | तैसें संत माहेर माझें । तुम्हीं मिनलिया मी लाडैजे । तेंचि ग्रंथाचेनि व्याजें । जाणिजो जी | ज्ञाने.१५.२०.५९७ |
| ७८००६. माझें | तरी नुरोनि वेगळेपण । रसीं भजिन्नलें लवण । तैसें नमन माझें जाण । बहु काय बोलों | ज्ञाने.१७.१८ |
| ७८००७. माझें | मज तुवां जी केलें तैसें । माझें मीपण धाडूनि देशें । स्तुतिमिषें पांचपिसें । बांधलें वाचे | ज्ञाने.१८.१८ |
| ७८००८. माझें | आणि आत्मया एथ कांहीं । सर्वथा लागु नाहीं । हें पुढारलासि तें देई । लाहाणें माझें | ज्ञाने.१८.१३.२९९ |
| ७८००९. माझें | पुत्र वित्त कलत्र । हे जालियाही स्वतंत्र । माझें न म्हणे पात्र । विषाचें जैसें | ज्ञाने.१८.४९.९५८ |
| ७८०१०. माझें | तेव्हां वैरिया कां मैत्रिया । तयासि माझें म्हणावया । समानता धनंजया । उरेचिही ना | ज्ञाने.१८.५३.१०७३ |
| ७८०११. माझें | हें ना भलतेणें व्याजें । तो जयातें म्हणे माझें । तें नोडवेचि कां दुजें । अद्वितीय जाला | ज्ञाने.१८.५३.१०७४ |
| ७८०१२. माझें | जे नेणणें माझें प्रकाशूनि । अन्यथात्वें मातें दाऊनि । सर्वही सर्वीं भजौनि । बुझावीतसे | ज्ञाने.१८.५४.१११४ |
| ७८०१३. माझें | तें अज्ञान आतां फिटलें । माझें दृष्टत्व मज भेटलें । निजबिंबीं एकवटलें । प्रतिबिंब जैसें | ज्ञाने.१८.५४.११२५ |
| ७८०१४. माझें | तैसा रूप होऊनि माझें । मातें क्रियावीण तो भजे । अलंकारु का सहजें । सोनयातें जेवीं | ज्ञाने.१८.५५.११४९ |
| ७८०१५. माझें | बोलतया बोलताचि भेटे । तेथें बोलिलें हे न घटे । तें मौन तंव गोमटें । स्तवन माझें | ज्ञाने.१८.५५.११५३ |
| ७८०१६. माझें | मग देखिजे ना न देखिजे । ऐसी जे दशा निपजे । ते तें दर्शन माझें । साचोकारें | ज्ञाने.१८.५५.११६३ |
| ७८०१७. माझें | क्रियाजात मी जालेपणें । घडे कांहींचि न करणें । तयाचि नांव पूजणें । खुणेचें माझें | ज्ञाने.१८.५५.११७८ |
| ७८०१८. माझें | देशें काळें स्वभावें । वेंचु जया न संभवे । तें पद माझें पावे । अविनाश तो | ज्ञाने.१८.५६.१२५८ |
| ७८०१९. माझें | अथवा हन अहंभावें । माझें बोलणें हें आघवें । कानामनाचिये शिंवे । नेदिसी टेंकों | ज्ञाने.१८.५८.१२७४ |
| ७८०२०. माझें | येवढेनि दारुणें । निमणेनवीण निमणें । पडेल जरी बोलणें । नेघसी माझें | ज्ञाने.१८.५८.१२७७ |
| ७८०२१. माझें | तरी अवधान पघळ । करूनियां आणिक एक वेळ । वाक्य माझें निर्मळ । अवधारीं पां | ज्ञाने.१८.६४.१३४१ |
| ७८०२२. माझें | म्हणौनि आघवींचि गूढें । जें पाऊनि अति उघडें । तें गोप्य माझें चोखडें । वाक्य आइक | ज्ञाने.१८.६४.१३५२ |
| ७८०२३. माझें | किंबहुना आपुलें मन । करीं माझें एकायतन । माझेनि श्रवणें कान । भरूनि घालीं | ज्ञाने.१८.६५.१३५५ |
| ७८०२४. माझें | पाठीं माझां तिये प्रसादीं । माझें ज्ञान जाय सिद्धी । तेणें मिसळिजे त्रिशुद्धी । स्वरूपीं माझां | ज्ञाने.१८.६५.१३८४ |
| ७८०२५. माझें | पैं आपुलेनि भेदेंविण । माझें जाणिजे जें एकपण । तयाचि नांव शरण । मज येणें गा | ज्ञाने.१८.६६.१३९८ |
| ७८०२६. माझें | तें तूं गुरुलिंग जी माझें । जें येकलेपणींचें विरजें । जयालागीं वोलांडिजे । अद्वैतबोधु | ज्ञाने.१८.७३.१५७० |
| ७८०२७. माझें | किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी गेलें । येथ माझें जी उरलें । पाईकपण | ज्ञाने.१८.७८.१७९२ |
| ७८०२८. माझेंचि | हें आंतबाहेर मियां कोंदलें । जग निखिल माझेंचि वोतिलें । कीं कैसें कर्म तयां आलें । जे मीचि नाहीं म्हणती | ज्ञाने.९.१९.३०२ |
| ७८०२९. माझेंचि | जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टि भोगी माझेंचि रूप । जयांचें मन संकल्प । माझाचि वाहे | ज्ञाने.९.३२.४४५ |
| ७८०३०. माझेंचि | जेणें चोखाळत दिसे न्याय । तो व्यवसायांत व्यवसाय । माझेंचि स्वरूप हें राय । सुरांचा म्हणे | ज्ञाने.१०.३६-३७.२८६ |

| | | |
|---|---|---|
| ७८०३१. माझेंही | या संतवाक्यासरिसें । म्हणितलें निवृत्तिदासें । माझेंही जी ऐसें । मनोगत | ज्ञाने.१३.११.६४७ |
| ७८०३२. माझेचि | तैसें भूतजात सर्व । माझेचि कीर अवयव । परि मायायोगें जीव- । दशे आले | ज्ञाने.७.१३.६६ |
| ७८०३३. माझेचि | म्हणोनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखती । अहंममताभ्रांती । विषयांध झाले | ज्ञाने.७.१३.६७ |
| ७८०३४. माझेचि | म्हणोनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखती । अहंममताभ्रांती । विषयांध झाले | ज्ञाने.७.१३.६७ |
| ७८०३५. माझेचि | वरी जी लोकांचें कीर साधारण । वायां आड सूतसें वोडण । केवीं सहसा म्हणें प्राण । माझेचि कांपती | ज्ञाने.११.२३.३५० |
| ७८०३६. माझेनि | जैसा उदकाचेनि आयुष्यें रसु । कां गगनाचेनि मानें अवकाशु । तैसा माझेनि रूपें रूपसु । पुरुषु तो गा | ज्ञाने.६.२९-३०.३९७ |
| ७८०३७. माझेनि | ऐसे माझेनि नामघोषें । नाहीं करिती विश्वाचीं दुःखें । अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें | ज्ञाने.९.१४.२०० |
| ७८०३८. माझेनि | जे अहंकारु वाहत आंगीं । आम्ही हरीचे भूषावयालागीं । जे लोभिये एकचि जगीं । माझेनि लोभें | ज्ञाने.९.२५.३६२ |
| ७८०३९. माझेनि | जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम । जे माझिया भुली सभ्रम । नेणती लोक | ज्ञाने.९.२५.३६३ |
| ७८०४०. माझेनि | जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम । जे माझिया भुली सभ्रम । नेणती लोक | ज्ञाने.९.२५.३६३ |
| ७८०४१. माझेनि | मग माझी नित्य शांती । तया दशा तेचि कांती । किंबहुना जिती । माझेनि जीवें | ज्ञाने.९.३१.४२९ |
| ७८०४२. माझेनि | तैसें उत्तमत्व तैंचि तरे । तैंचि सर्वज्ञता सरे । जैं मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें | ज्ञाने.९.३२.४५५ |
| ७८०४३. माझेनि | माझेनि अनुसंधानें देख । संकल्पु जाळणें निःशेख । मद्याजी चोख । याचि नांव | ज्ञाने.९.३४.५१८ |
| ७८०४४. माझेनि | आतां पैं माझेनि एकें अंशें । हें जग व्यापिलें असे । यालागीं भेदु सांडूनि सरिसें । साम्यें भज | ज्ञाने.१०.४२.३१७ |
| ७८०४५. माझेनि | एथ श्रवणाचेनि द्वारें । तीर्थीं रिघतां सोपारें । ज्ञानदेव म्हणे दातारें । माझेनि केलें | ज्ञाने.११.८ |
| ७८०४६. माझेनि | तंव माझेनि नामें धैर्य हारपलें । कीं तयाहीवरी विश्वरूपदर्शन जाहलें । हें असो परि मज भलें आतुडविलें । उपदेशासी | ज्ञाने.११.२४.३७२ |
| ७८०४७. माझेनि | माझेनि तिखटपणें । कैसें निवटे हें शस्त्र कायि जाणे । कां आपुलिया मारा नेणे । विष जैसें | ज्ञाने.११.३०.४३९ |
| ७८०४८. माझेनि | तरि तयाचा गा मज मोहो । काय सांगों तो पढियावो । हें असो जीवें जीवो । माझेनि तो | ज्ञाने.१२.१५.१७० |
| ७८०४९. माझेनि | परि हें मियां केलें । कीं हे माझेनि जालें । ऐसें नाहीं ठेविलें । वासनेंमाजीं | ज्ञाने.१३.८.५२६ |
| ७८०५०. माझेनि | नाहीं माझेनि पाडें वाडु । मी सर्वज्ञु एकुचि रूढु । ऐसा गर्वतुष्टीगंडु । घेऊनि ठाके | ज्ञाने.१३.११.७१७ |
| ७८०५१. माझेनि | तैसी माझेनि संगें । अविद्या नाना जगें । आर घेवों लागे । अणियाची | ज्ञाने.१४.३.९६ |
| ७८०५२. माझेनि | कां हातीं घेतलिया माळा । फिटे सर्पाभासाचा कांटाळा । तैसा माझेनि बोधें टवाळा । नागवे जो | ज्ञाने.१५.१९.५६० |
| ७८०५३. माझेनि | तैसा माझेनि प्रसादें । जीवकणु जयाचा उपमर्दे । तो संसाराचेनि बाधे । बागुलें केवीं | ज्ञाने.१८.५८.१२७२ |
| ७८०५४. माझेनि | किंबहुना आपुलें मन । करीं माझें एकायतन । माझेनि श्रवणें कान । भरूनि घालीं | ज्ञाने.१८.६५.१३५५ |
| ७८०५५. माझेनि | अहो जी माझेनि स्वामी । मज संत जोडुनि तुम्हीं । दिधलेति ते सर्वकामीं । परिपूर्ण जालों | ज्ञाने.१८.७८.१७७४ |
| ७८०५६. माझेनिचि | पैं माझेनिचि आंगें । पौढल्या हे जागे । आणि सत्तासंभोगें । गुर्विणी होय | ज्ञाने.१४.३.८९ |
| ७८०५७. माझेपण | म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण । एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक | ज्ञाने.९.३२.४५६ |

| | | |
|---|---|---|
| ७८०५८. माझेपण | अगा कवणें एकें बोलें । माझेपण जऱ्ही जाहालें । तरी मी होणें आलें । हाता निरुतें | ज्ञाने.९.३२.४७३ |
| ७८०५९. माझेया | माझेया विस्तारलेपणा नांवें । हें जगचि नोहे आघवें । जैसें दूध मुरालें स्वभावें । तरि तेंचि दहीं | ज्ञाने.९.४.६४ |
| ७८०६०. माझेयाचि | येर तनुमनप्राणी । जे निरंतर माझेयाचि वाहणी । ते देहाचां निर्वाणीं । मीचि होती | ज्ञाने.७.२३.१५० |
| ७८०६१. माणिक | म्हातारपणीं जालें । माणिक एक विपायिलें । तयाचें कां जेतुलें । मातापितरां | ज्ञाने.१३.११.७८७ |
| ७८०६२. माणिकीं | एकें सावियाचि चुळुकीं । जैसें ब्रह्मकटाह खचिलें माणिकीं । एकें अरुणोदयासारिखीं । कुंकुमवर्णें | ज्ञाने.११.५.१३३ |
| ७८०६३. माणिकुलियांचिया | माणिकुलियांचिया कणिया । सावियाचि अणुमानिया । तैसिया सर्वांगीं उधवती अणिया । रोमांचिया | ज्ञाने.६.१४.२६४ |
| ७८०६४. माणिकें | जालेनि जगें मी झांकें । तरी जगत्वें कोण फांके । किळेवरी माणिकें । लोपिजे काई | ज्ञाने.१४.४.१२३ |
| ७८०६५. माणुसपणाची | तो चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ । परी माणुसपणाची भांब । लोकाचि भागु | ज्ञाने.१०.३.७७ |
| ७८०६६. माणुसा | व्याधि लागलिया माणुसा । नये भोग दाऊं जैसा । निकें न साहे जो तैसा । पुढिलांचें | ज्ञाने.१३.११.७१८ |
| ७८०६७. माणुसां- | ज्ञानियां कर्मठां तापसां । यया खुणेचिया माणुसां- । माजीं तो एकु गा जैसा । पढिये मज | ज्ञाने.१८.६९.१५१५ |
| ७८०६८. माणुसाचें | ना कांपतया पद्मदळा । वरीलिया बैसका नाहीं जळा । कां चित्त जैसें व्याकुळा । माणुसाचें | ज्ञाने.१५.१.११३ |
| ७८०६९. माणुसाप्रती | तैसें जयाचें मन । माणुसाप्रती आन आन । नव्हे आणि वर्तन । ऐसें पैं तें | ज्ञाने.१३.७.३५६ |
| ७८०७०. माणुसीं | अगा स्वर्गींची उर्वशी । ऐकोनि जेवीं माणुसीं । वारत्या लावीजती आकाशीं । यागांचिया | ज्ञाने.१८.१८.४८२ |
| ७८०७१. माणुसें | नाना उंसांचीं कणसें । कां नपुंसकें माणुसें । बन लागलें जैसें । साबरीचें | ज्ञाने.१८.२२.५७६ |
| ७८०७२. मात | म्हणवूनि कौरव हे वधिजती । मग आम्ही भोग भोगिजती । हे असो मात अघडती । अर्जुन म्हणे | ज्ञाने.१.३७.२३५ |
| ७८०७३. मातंग- | तेथ विभांडुनियां जग । आणिले पदार्थ अनेग । तेणें घालूं लागे मातंग- । गवादीसी | ज्ञाने.१७.२२.२९९ |
| ७८०७४. मातंग- | आतां तामसाचेंही लिंग । सांगेन तें वोळख चांग । डावलावया मातंग- । सदन जैसें | ज्ञाने.१८.२१.५४८ |
| ७८०७५. मातलिया | कां मातलिया सरडा । पुढती बुड पुढती शेंडा । हिंडणवारा कोरडा । तैसा जया | ज्ञाने.१३.११.६८९ |
| ७८०७६. मातलिया | आणि मातलिया सागरीं । मोकलिलिया तरी । लाटांचां येरझारीं । आंदोळे जेवीं | ज्ञाने.१३.११.८०४ |
| ७८०७७. मातलिया | आणि मातलिया इंद्रियांचे वेग । कां प्राचीनें खवळले रोग । अथवा योगवियोग । प्रियाप्रियांचे | ज्ञाने.१६.३.१९१ |
| ७८०७८. मातलिया | मातलिया कुंजरा । आगळी जाली मदिरा । तैसा मदाचा ताठा तंव जरा । चढतां आंगीं | ज्ञाने.१६.१०.३२५ |
| ७८०७९. मातली | जे अमृताची वोतली । कीं प्रेमचि पिऊन मातली । म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली । निघों नेणें | ज्ञाने.५.२९.१७२ |
| ७८०८०. मातली | जे अनर्थाचे कानवेरी । आवाळुवें चाटीत निघे बाहेरी । जे प्रमादपर्वतींची दरी । सदाचि मातली | ज्ञाने.९.१२.१८२ |
| ७८०८१. मातले | जे ऐसेनि सुखें मातले । आपणपांचि आपण गुंतले । ते मी जाणें निखळ वोतले । सामरस्याचे | ज्ञाने.५.२४-२५.१३७ |
| ७८०८२. मातलें | हें असो काळें अवंतिलें रण । कां सर्वसंहारें मातलें मरण । तैसें अतिभिंगुळवाणेंपण । वदनीं तुझिये | ज्ञाने.११.२३.३४६ |
| ७८०८३. मातलें | आंधळें हातिरूं मातलें । डोंगरीं जैसें पेटलें । तैसें विषयीं सुटलें । चित्त जयाचें | ज्ञाने.१३.११.६९८ |
| ७८०८४. मातलें | कां आडवोहळा पाणी आलें । म्हैसयाचें जुंझ मातलें । तैसें तारुण्याचें चढलें । भुररें जया | ज्ञाने.१३.११.७५५ |

| | | |
|---|---|---|
| ७८०८५. मातलेपण | हे अनंत चारु चरण । बहु उदर आणि नानावर्ण । कैसें प्रतिवदनीं मातलेपण । आवेशाचें | ज्ञाने.११.२३.३४१ |
| ७८०८६. माता | कां संवचोरां चुकवितां । दिवस लागलिया माता । कोपावें कीं जीविता । जिताणें कीजे | ज्ञाने.१३.७.३३६ |
| ७८०८७. माता | याकारणें मी पिता । महद्‌ब्रह्म माता । अपत्य पंडुसुता । जगडंबरु | ज्ञाने.१४.४.११६ |
| ७८०८८. माता | हा जनकु हे माता । हा मी गौर हीन पुरता । पुत्र वित्त कांता । माझें हें ना | ज्ञाने.१५.१६.४९२ |
| ७८०८९. माता | ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्तां । अनन्यजीवना माता । बाळका जैसी | ज्ञाने.१८.६८.१५१२ |
| ७८०९०. माताचि | तरी दोनीं यें त्यजावीं । मग माताचि ते भजावी । वांचूनि मुखालागीं वाळावी । गायचि सगळी | ज्ञाने.१८.९.२०३ |
| ७८०९१. मातापितरमरणें | आणि सोमसूर्यग्रहणें । येऊनि करविती पार्वणें । कां मातापितरमरणें । अंकित जे दिवस | ज्ञाने.१८.२.११० |
| ७८०९२. मातापितरां | म्हातारपणीं जालें । माणिक एक विपायिलें । तयाचें कां जेतुलें । मातापितरां | ज्ञाने.१३.११.७८७ |
| ७८०९३. मातापितरां | तरी घरीं मातापितरां । धड बोली नाहीं संसारां । येर विश्व भरी आदरा । मूर्खु जैसा | ज्ञाने.१८.२४.५९५ |
| ७८०९४. मातापितरें | देखें मातापितरें अर्चिजती । सर्वस्वें तोष पावविजती । तिये पाठीं केवीं वधिजती । आपुलां हातीं | ज्ञाने.२.४.३२ |
| ७८०९५. मातापितरें | सकल तीर्थांचिये धुरे । जियें कां मातापितरें । तयां सेवेसि कीर शरीरें । लोण कीजे | ज्ञाने.१७.१४.२०७ |
| ७८०९६. माताही | अर्धनारीनटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी । तेविं मी चराचरीं । माताही होय | ज्ञाने.९.१७.२७० |
| ७८०९७. मातियेचें | देखें सोनियाचें निखळ । मेरुयेसणें ढिसाळ । आणि मातियेचें डिखळ । सरिसेंचि मानी | ज्ञाने.६.८.९२ |
| ७८०९८. मातियेवीण | कैंचा लोंवेवीण कांबळा । मातियेवीण मोदळा । कां जळेंवीण कल्लोळा । होणें आहे | ज्ञाने.१८.४०.८१४ |
| ७८०९९. माती | मागां बाळपणीं येणें श्रीपती । जैं एक वेळ खादली होती माती । तैं कोपोनियां हातीं । यशोदा धरिला | ज्ञाने.११.९.१८२ |
| ७८१००. माती | इये शरीरींची माती । मेळवीन तिये क्षिती । जेथ श्रीचरण उभे ठाती । आराध्याचे | ज्ञाने.१३.७.४३१ |
| ७८१०१. माती | तैसें उंचौनि लोटिलें कामें । नेहटती क्रोधाचिये ढेमे । तरी रागद्वेषें प्रेमें । न माती केंही | ज्ञाने.१६.१२.३४१ |
| ७८१०२. माती | पडोनि गेलिया भिंती । चित्रांची केवळ होय माती । कीं पाहालेया राती । आंधारें उरे | ज्ञाने.१८.१२.२६३ |
| ७८१०३. माती | लोह उभें खाय माती । तें परिसाचिये संगती । सोनें जालया पुढती । न शिविजे मळें | ज्ञाने.१८.६६.१४०७ |
| ७८१०४. माती | श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं होती । तेणें कोळियें त्रिजगतीं । येकवद केली | ज्ञाने.१८.७८.१७३० |
| ७८१०५. मातु | तरी पुत्रस्नेहें मोहितु । धृतराष्ट्र असे पुसतु । म्हणे संजया सांगें मातु । कुरुक्षेत्रींची | ज्ञाने.१.१.८५ |
| ७८१०६. मातु | वरी भीमसेन बेथु । तो जाहला असे सेनानाथु । ऐसें बोलोनि हे मातु । सांडिली तेणें | ज्ञाने.१.१०.१२० |
| ७८१०७. मातु | तेथ भेडांची कवण मातु । कांचया केर फिटतु । जेणें दचकला कृतांतु । आंग नेघे | ज्ञाने.१.१३.१३४ |
| ७८१०८. मातु | ऐसी स्वर्गीं मातु । देखोनि तो आकांतु । तंव पांडवदळाआंतु । वर्तलें कायी | ज्ञाने.१.१३.१३७ |
| ७८१०९. मातु | जो आपण सर्वज्ञनाथु । निरूपिता होईल श्रीअनंतु । ते ज्ञानदेवो सांगेल मातु । निवृत्तिदासु | ज्ञाने.२.७२.३७५ |
| ७८११०. मातु | आतां पुनरपि तो अनंतु । आद्य एकी मातु । सांगेल तेथ पंडुसुतु । प्रश्नु करील | ज्ञाने.३.४३.२७४ |
| ७८१११. मातु | परी हेचि मातु आघवी । मी परियेसें तैशी सांगावी । जे तुवांचि तया रवी केवीं । उपदेशु केला | ज्ञाने.४.४.४० |

| | | |
|---|---|---|
| ७८११२. मातु | म्हणोनि तेथिंची मातु । न चढेचि बोलाचा हातु । जेणें संवादाचिया गांवाआंतु । पैठी कीजे | ज्ञाने.६.१५.३११ |
| ७८११३. मातु | ऐसा कुरुक्षेत्रींचा वृत्तांतु । संजयो रायासी असे सांगतु । तेचि परियसा पुढां मातु । ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचा | ज्ञाने.८.२८.२७१ |
| ७८११४. मातु | तैसा मनुष्यलोकाआंतु । तो जरी जाहला प्राकृतु । तऱ्ही प्रकृतिदोषाची मातु । नेणिजे तेथ | ज्ञाने.१०.३.७९ |
| ७८११५. मातु | तयां आघवियांचिआंतु । घरडोळी घेऊनि असें पाहतु । परि ही देखिली ऐकिली मातु । आतुडेचिना | ज्ञाने.११.४५.५८६ |
| ७८११६. मातु | हां हो परतत्त्वाआंतु । कें प्रकृतीची मातु । हा क्षेत्रवृत्तांतु । उगें आइका | ज्ञाने.१३.४.४१ |
| ७८११७. मातु | धर्मादिकां चौंहीआंतु । पुरुषार्थाची तैंचि मातु । करावी जैं संघातु । सांडील हा | ज्ञाने.१६.२२.४३३ |
| ७८११८. मातु | जे आत्मा मी कर्मातीतु । सर्वकर्मसाक्षिभूतु । हे आपली कहीं मातु । नायकेचि कानीं | ज्ञाने.१८.१६.३८४ |
| ७८११९. मातु | कां रात्रीचिया पोटा आंतु । निगाला जो हा भास्वतु । तो रात्री ऐसी मातु । ऐके कायी | ज्ञाने.१८.१७.४१७ |
| ७८१२०. मातु | आणि तयां करणेयाआंतु । घडो तिहीं लोकां घातु । परी तेणें केला हे मातु । बोलोंचि नये | ज्ञाने.१८.१७.४४८ |
| ७८१२१. मातु | मग भरलेया जगाआंतु । जाऊनिया तिजयाची मातु । होऊनि ठायील एकांतु । आम्हां तुम्हां | ज्ञाने.१८.६५.१३६२ |
| ७८१२२. मातुचा | तो तरी आइकिजे बहुतां काळांचा । आणि तूं तंव कृष्ण सांपेचा । म्हणोनि गा इये मातुचा । विसंवादु | ज्ञाने.४.४.३८ |
| ७८१२३. मातुला | सुवायें मेघु सांवरे । जैसा चंद्रें सिंधु भरे । तैसा मातुला रसु आदरें । श्रोतयाचेनि | ज्ञाने.१३.३४.११५१ |
| ७८१२४. मातुळ | एथ शालक सासरे मातुळ । आणि बंधु कीं हे सकळ । पुत्र नातू केवळ । इष्टही असती | ज्ञाने.१.३४.२२३ |
| ७८१२५. मातुही | ज्ञानियांचां हन ठायीं । याची मातुही कीर नाहीं । देहीं देहभावो जिहीं । स्ववश केले | ज्ञाने.५.२३.१२९ |
| ७८१२६. मातुही | परि तोचि योगु कैसा केवीं जाणों । आम्ही येतुले दिया मातुही नेणों । म्हणोनि मनातें जी म्हणों । अनावर हें | ज्ञाने.६.३६.४२८ |
| ७८१२७. मातू | ज्ञानदेव निवृत्तीचा म्हणे । काइ बोलिलें श्रीहरी तेणें । अर्जुना आघवियाचि मातू अंत:करणें । धडौता आहासि | ज्ञाने.१०.४९ |
| ७८१२८. मातृका | हो कां आत्मनिवेदनातळींची । जे पीठिका आहे सख्याची । पार्थु अधिष्ठात्री तेथिंची । मातृका गा | ज्ञाने.६.१०.१२७ |
| ७८१२९. मातृकोदरकुहरीं | मातृकोदरकुहरीं । सूनि विष्ठेचां दाथरीं । जठरीं नवमासवरी । उकडला जैं | ज्ञाने.१३.११.७३२ |
| ७८१३०. माते | जें न संगेचि पितया वसुदेवासी । जें न संगेचि माते देवकीसी । जें न संगेचि बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंशीं बोलत | ज्ञाने.४.८ |
| ७८१३१. माते | म्हणोनि वेगीं प्रसन्न होई देवराया । संहरीं संहरीं आपुली माया । काढी माते महाभया- । पासोनियां | ज्ञाने.११.२५.३८५ |
| ७८१३२. मातें | आइकें सखेदु बोले श्रीकृष्णातें । आतां नाळवावें तुम्हीं मातें । मी सर्वथा न झुंजें येथें । भरंवसेनि | ज्ञाने.२.९.८२ |
| ७८१३३. मातें | जो आत्मबोधयुक्तु । होऊनि असे सततु । जो मातें हृदयाआंतु । विसंबेना | ज्ञाने.२.६१.३१७ |
| ७८१३४. मातें | तरी मातें केवी हरी । म्हणसी पार्था संग्रामु करीं । इये लाजसीना महाघोरीं । कर्मीं सुतां | ज्ञाने.३.१.३ |
| ७८१३५. मातें | ना तरी झकवीतु आहासी मातें । कीं तत्त्वचि कथिलें ध्वनितें । हें अवगमितां निरुतें । जाणवेना | ज्ञाने.३.२.१६ |
| ७८१३६. मातें | काय सांकडें कांहीं मातें । कीं कवणें एकें आर्तें । आचरें मी धर्मातें । म्हणसी जरी | ज्ञाने.३.२२.१६१ |
| ७८१३७. मातें | मागील मुमुक्षु जे होते । तिहीं ऐशियाचि जाणोनि मातें । कर्में केलीं समस्तें । धनुर्धरा | ज्ञाने.४.१५.८२ |
| ७८१३८. मातें | तैसी सद्गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे । म्हणऊनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे | ज्ञाने.६.३५ |

| | | |
|---|---|---|
| ७८१३९. मातें | एऱ्हवीं तरी अर्जुना । जो एकवटलिया भावना । सर्वभूतीं अभिन्ना । मातें भजे | ज्ञाने.६.२९-३०.३९३ |
| ७८१४०. मातें | म्हणऊनि भूतें मातें नेणती । माझींच परी मी नव्हती । जैसी जळींचीं जळीं न विरती । मुक्ताफळें | ज्ञाने.७.१३.६४ |
| ७८१४१. मातें | म्हणोनि ते मातें चुकले । आइकां चतुर्विध मज भजले । जिहीं आत्महित केलें । वाढतें गा | ज्ञाने.७.१५-१६.१०८ |
| ७८१४२. मातें | परि जाणोनियां मातें । जो पाहों विसरला मागौतें । जैसें सागरा येऊनि सरितें । मुरडावें ठेलें | ज्ञाने.७.१८.१२४ |
| ७८१४३. मातें | ऐसे उभयतां आंधारीं पडले । म्हणोनि पासींचि मातें चुकले । मग सर्वभावें अनुसरले । देवतांतरां | ज्ञाने.७.२०.१४० |
| ७८१४४. मातें | परी ते भक्त मातें नेणती । जे कल्पनेबाहेरी न निघती । म्हणोनि कल्पित फळ पावती । अंतवंत | ज्ञाने.७.२३.१४७ |
| ७८१४५. मातें | कां जे योगमायापडळें । हे जाले आहाती आंधळे । म्हणोनि प्रकाशाचेनिहि देहबळें । न देखती मातें | ज्ञाने.७.२५.१५८ |
| ७८१४६. मातें | जिहीं साधिभूता मातें । प्रतीतीचेनि हातें । धरूनि अधिदैवातें । शिवतलें गा | ज्ञाने.७.३०.१८० |
| ७८१४७. मातें | परी नेणों कैसें पैं गा । जे जडोनि गेले माझिया आंगा । ते प्रयाणींचिया लगबगा । न सांडितीच मातें | ज्ञाने.७.३०.१८३ |
| ७८१४८. मातें | आणि नियता अंत:करणीं । तूं जाणिजसी देहप्रयाणीं । तें कैसेनि हें शार्ङ्गपाणी । परिसवा मातें | ज्ञाने.८.२.५ |
| ७८१४९. मातें | जें आतांचि सांगितलें होतें । अगा अधियज्ञ म्हणितला जयातें । जे आदींचि तया मातें । जाणोनि अंतीं | ज्ञाने.८.५.५९ |
| ७८१५०. मातें | म्हणोनि यापरी मातें । अंतकाळीं जाणतसाते । जे मोकलिती देहातें । ते मीचि होती | ज्ञाने.८.५.६८ |
| ७८१५१. मातें | यापरी त्यजी देहातें । तो त्रिशुद्धी पावे मातें । जया पावणया परौतें । आणिक पावणें नाहीं | ज्ञाने.८.१३.११९ |
| ७८१५२. मातें | जे विषयांसि तिळांजळी देऊनि । प्रवृत्तीवरी निगड वाऊनि । मातें हृदयीं सूनि । भोगिताती | ज्ञाने.८.१४-१५.१२४ |
| ७८१५३. मातें | तयां देहावसान जैं पावे । तैं तिहीं मातें स्मरावें । मग म्यां जरी पावावें । तरि उपास्ति ते कायसी | ज्ञाने.८.१४-१५.१२७ |
| ७८१५४. मातें | नातरी चेइलियानंतरें । न बुडिजे स्वप्नींचेनि महापूरें । तेवीं मातें पावले ते संसारें । लिंपतीचि ना | ज्ञाने.८.१६.१५३ |
| ७८१५५. मातें | तैसीं अहंममतेचिये लवडसवडी । मातें न पवतीचि बापुडीं । म्हणोनि जन्ममरणाचिये दुथडी । डहुळितें ठेलीं | ज्ञाने.९.३.६२ |
| ७८१५६. मातें | यालागीं मजपासूनि भूतें । आनें नव्हती हें निरुतें । आणि भूतांवेगळिया मातें । कहींच न मनीं हो | ज्ञाने.९.५.८८ |
| ७८१५७. मातें | जळीं चंद्रिकेचिया पसरती वेली । ते वाढी चंद्रें नाहीं वाढविली । तेविं मातें पावोनि ठेलीं । दुरी कर्मे | ज्ञाने.९.८.१२३ |
| ७८१५८. मातें | आणि सुटलिया सिंधुजळाचा लोटु । न शके धरूं सैंधवाचा घाटु । तेविं सकळ कर्मा मीच शेवटु । तें काइ बांधती मातें | ज्ञाने.९.९.१२४ |
| ७८१५९. मातें | नातरी ज्वरें विटाळलें मुख । तें दुधातें म्हणे कडू विख । तेविं अमानुषा मानुष । मानाल मातें | ज्ञाने.९.११.१४२ |
| ७८१६०. मातें | पैं स्थूलदृष्टी देखती मातें । तेंचि न देखणें जाण निरुतें । जैसें स्वप्नींचेनि अमृतें । अमरा नोहिजे | ज्ञाने.९.११.१४४ |
| ७८१६१. मातें | एऱ्हवीं स्थूलदृष्टी मूढ । मातें जाणती कीर दृढ । परि तें जाणणेंचि जाणणेया आड । रिगोनि ठाके | ज्ञाने.९.११.१४५ |
| ७८१६२. मातें | मातें येणें येणें प्रकारें । जाणती मनुष्य ऐसेनि आकारें । म्हणऊनि ज्ञानचि तें आंधारें । ज्ञानासि करी | ज्ञाने.९.११.१७१ |
| ७८१६३. मातें | मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे । परि दुजेपण मनोधर्मे । शिवतलें नाहीं | ज्ञाने.९.१३.१९५ |
| ७८१६४. मातें | हें बहु असो यापरी । कीर्तित मातें अवधारीं । एक विचरती चराचरीं । पांडुकुमरा | ज्ञाने.९.१४.२११ |
| ७८१६५. मातें | म्हणें भलें केलें पार्था । एऱ्हवीं हा अनवसरु सर्वथा । परि बोलवीतसे आस्था । तुझी मातें | ज्ञाने.९.१४.२३२ |

| | | |
|---|---|---|
| ७८१६६. मातें | तेविं नानाविधा व्यक्ती । आनानें नामें आनानी वृत्ती । ऐसें जाणती भेदलां भूतीं । अभेदा मातें | ज्ञाने.९.१५.२५२ |
| ७८१६७. मातें | परि तें असो येणें उचितें । ज्ञानयज्ञें यजितसांते । उपासिती मातें । ते सांगितले | ज्ञाने.९.१५.२६३ |
| ७८१६८. मातें | अखंड सकळ हें सकळां मुखीं । सहज अर्पत असे मज एकीं । कीं नेणणेंयासाठीं मूर्खीं । न पविजेचि मातें | ज्ञाने.९.१५.२६४ |
| ७८१६९. मातें | म्हणोनि अर्जुना मी नसें । ऐसा कवणु ठाव असे । परि प्राणियांचें दैव कैसें । जे न देखती मातें | ज्ञाने.९.१९.३०० |
| ७८१७०. मातें | जे श्रुतित्रयातें जाणोनि । शतवरी यज्ञ करूनि । यजिलिया मातें चुकोनि । स्वर्गु वरिती | ज्ञाने.९.२०.३१० |
| ७८१७१. मातें | तैसें शतक्रतूं यजिलें मातें । कीं ईप्सितातिं स्वर्गसुखातें । आतां पुण्य कीं हें निरुतें । पाप नोहे | ज्ञाने.९.२०.३१२ |
| ७८१७२. मातें | स्वर्गा पुण्यात्मकें  पापें येइजे । पापात्मकें पापें नरका जाइजे । मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य | ज्ञाने.९.२०.३१६ |
| ७८१७३. मातें | परि हें असो आतां प्रस्तुत । ऐकें यापरी ते दीक्षित । यजुनि मातें याचित । स्वर्गभोगु | ज्ञाने.९.२०.३१८ |
| ७८१७४. मातें | एवं थितिया मातें चुकले । जीहीं पुण्यें स्वर्ग कामिले । तयां अमरपण तें वावो जालें । आतां मृत्युलोकु | ज्ञाने.९.२१.३३० |
| ७८१७५. मातें | अर्जुना वेदु जऱ्ही जाहला । तरी मातें नेणतां वायां गेला । कणु सांडुनि उपणिला । कोंडा जैसा | ज्ञाने.९.२१.३३३ |
| ७८१७६. मातें | म्हणऊनि मज एकेंविण । हे त्रयीधर्म अकारण । आतां मातें जाणोनि कांहीं नेण । तूं सुखिया होसी | ज्ञाने.९.२१.३३४ |
| ७८१७७. मातें | ऐसे अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसांते मातें । जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं | ज्ञाने.९.२२.३३७ |
| ७८१७८. मातें | आतां आणिकही संप्रदायें । परी मातें नेणती समवायें । जे अग्निइंद्रसूर्यसोमाये । म्हणऊनि यजिती | ज्ञाने.९.२३.३४४ |
| ७८१७९. मातें | येर मातें नेणोनि भजन । तें वायांचि गा आनेंआन । म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें | ज्ञाने.९.२३.३५० |
| ७८१८०. मातें | मी सकळां यज्ञांचा आदि । आणि यजना या मीचि अवधि । कीं मातें चुकोनि दुर्बुद्धि । देवां भजले | ज्ञाने.९.२४.३५२ |
| ७८१८१. मातें | म्हणऊनि ते पार्था । मातें न पवतीचि सर्वथा । मग मनीं वाहिली जे आस्था । तेथ आले | ज्ञाने.९.२४.३५४ |
| ७८१८२. मातें | म्हणोनि अर्जुना अवधारीं । तूं बुद्धि एकी सोपारी करीं । तरी सहजें आपुलिया मनोमंदिरीं । न विसंबें मातें | ज्ञाने.९.२६.३९७ |
| ७८१८३. मातें | जे ऐसिया मातें जाणोनि । अहंकाराचा कुरुठा मोडोनि । जे जीवें कर्मे करूनि । भजती मातें | ज्ञाने.९.२९.४०८ |
| ७८१८४. मातें | जे ऐसिया मातें जाणोनि । अहंकाराचा कुरुठा मोडोनि । जे जीवें कर्मे करूनि । भजती मातें | ज्ञाने.९.२९.४०८ |
| ७८१८५. मातें | पाहें पां सावजें हातिरुं धरिलें । तेणें तया काकुळती मातें स्मरिलें । कीं तयाचें पशुत्व वावो जाहलें । पातलिया मातें | ज्ञाने.९.३१.४४२ |
| ७८१८६. मातें | पाहें पां सावजें हातिरुं धरिलें । तेणें तया काकुळती मातें स्मरिलें । कीं तयाचें पशुत्व वावो जाहलें । पातलिया मातें | ज्ञाने.९.३१.४४२ |
| ७८१८७. मातें | तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यादि इया । जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें | ज्ञाने.९.३२.४६० |
| ७८१८८. मातें | नातरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें । कीं अखंड वैरवशें । चैद्यादिकीं | ज्ञाने.९.३२.४६६ |
| ७८१८९. मातें | यापरी पापयोनीही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना । मातें भजतां सदना । माझिया येती | ज्ञाने.९.३२.४७४ |
| ७८१९०. मातें | ऐसे पुण्यपूज्य जे ब्राह्मण । आणि माझां ठायीं अतिनिपुण । आतां मातें पावती हें कवण । समर्थणें | ज्ञाने.९.३३.४८३ |
| ७८१९१. मातें | जेथ चहूंकडे जळत वणवा । तेथूनि न निगिजे केविं पांडवा । तेविं लोकां येऊनिया सोपद्रवां । केविं न भजिजे मातें | ज्ञाने.९.३३.४९२ |
| ७८१९२. मातें | अगा मातें न भजावयालागीं । कवण बळ पां आपुलां आंगीं । काइ घरीं कीं भोगीं । निश्चिंती केली | ज्ञाने.९.३३.४९३ |

| | | |
|---|---|---|
| ७८१९३. मातें | तरी किरीटी तूं मातें । नेणसी ना निरुतें । तरि गा जो मी येथें । तें विश्वचि हें | ज्ञाने.१०.१.६३ |
| ७८१९४. मातें | आणि जळचरां उदधीचें मान । मशकां नोलांडवे गगन । तैसें महर्षींचें ज्ञान । नेणे मातें | ज्ञाने.१०.२.६६ |
| ७८१९५. मातें | तरी मियां जालियां जीवां । महर्षीं अथवा देवां । मातें जाणावया होआवा । अवकाशु गा | ज्ञाने.१०.२.७१ |
| ७८१९६. मातें | मी आदीसि परु । सकळलोकमहेश्वरु । ऐसिया मातें जो नरु । यापरी जाणे | ज्ञाने.१०.३.७५ |
| ७८१९७. मातें | तो आपसयेंचि सांडिजे पापीं । जैसा जळत चंदनु सर्पीं । तैसा मातें जाणे तो संकल्पीं । वर्जूनि घालिजे | ज्ञाने.१०.३.८० |
| ७८१९८. मातें | तेंचि मातें कैसें जाणिजे । ऐसें कल्पी जरी चित्त तुझें । तरी मी ऐसा हे माझे । भाव ऐकें | ज्ञाने.१०.३.८१ |
| ७८१९९. मातें | जैसीं भूतें आहाती सिनानीं । तैसेचि हे वेगळाले मानीं । एक उपजती माझां ज्ञानीं । एक नेणती मातें | ज्ञाने.१०.४-५.८७ |
| ७८२००. मातें | कां जे ऐसें किरीटी । मातें भजे जो अभेदा दिठी । तयाचिये भजनाचिये नाटीं । सूती मज | ज्ञाने.१०.७.१०९ |
| ७८२०१. मातें | ऐसिया व्यापका मातें । मानूनि जे भजती भलतेथें । परि साचोकारें उदितें । प्रेमभावें | ज्ञाने.१०.८.११५ |
| ७८२०२. मातें | ऐसेनि जे निजज्ञानीं । खेळत सुखें त्रिभुवनीं । जगद्रूपा मनीं । सांठवूनि मातें | ज्ञाने.१०.८.११७ |
| ७८२०३. मातें | तैसेंनि मातें विश्वीं कथित । कथितेनि तोषें कथूं विसरत । मग तया विसरामाजीं विरत । आंगें जीवें | ज्ञाने.१०.९.१२८ |
| ७८२०४. मातें | जिये पदवीचेनि पोषकें । ते मातें पावती यथासुखें । हे पाळती मज विशेखें । आवडे करूं | ज्ञाने.१०.१०.१३६ |
| ७८२०५. मातें | पक्षिजातीमाझारीं । गरुड तो मी अवधारीं । यालागीं जो पाठीवरी । वाहों शके मातें | ज्ञाने.१०.३०.२४९ |
| ७८२०६. मातें | कां पृथ्वीये परमाणूंचा उगाणा घ्यावा । तरि भूगोलुचि काखे सुवावा । तैसा विस्तारु माझा पहावा । तरि जाणावें मातें | ज्ञाने.१०.३२-३३.२६० |
| ७८२०७. मातें | ऐसिया व्यापका मातें जैं जाणावें । तैं विभूतिभेंदें काय करावें । परि हे तुझी योग्यता नव्हे । म्हणोनि असो | ज्ञाने.१०.३२-३३.२६५ |
| ७८२०८. मातें | देखिलेनि पदार्थें । जे आठवूनि दे मातें । ते स्मृतिही पैं एथें । त्रिशुद्धी मी | ज्ञाने.१०.३४.२७८ |
| ७८२०९. मातें | म्हणोनि समर्थ जें जें करी । तें न हो न ये चराचरीं । तुम्ही संत तयापरी । बोलवा मातें | ज्ञाने.११.२४ |
| ७८२१०. मातें | परि साचचि महामोहाचां पुरीं । बुडालेया देखोनि सीसवरी । तुवां आपणपें घालोनि श्रीहरी । मग काढिलें मातें | ज्ञाने.११.१.४९ |
| ७८२११. मातें | आपुलें प्रतिबिंब नेणतां । सिंह कुहां घालील देखोनि आतां । ऐसा धरिजे तेवीं अनंता । राखिलें मातें | ज्ञाने.११.१.५५ |
| ७८२१२. मातें | ऐसिया अहंकाराचिये वाढी । मियां आग्रहजळीं दिधली होती बुडी । चांगचि तूं एऱ्हवीं काढी । कवणु मातें | ज्ञाने.११.१.५८ |
| ७८२१३. मातें | मग म्हणतसे प्रसीद प्रसीद । वाचा होतसे सद्गद । काढी जी अपराध- । समुद्रौनि मातें | ज्ञाने.११.४४.५६८ |
| ७८२१४. मातें | तूं वर्णनीय परी लोभें । मातें वर्णिसी पां सभे । तरि मियां वल्गिजे क्षोभें । अधिकाधिक | ज्ञाने.११.४४.५७० |
| ७८२१५. मातें | म्हणोनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलते । आज्ञापीं मातें । ग्रंथनिरूपणीं | ज्ञाने.१२.१० |
| ७८२१६. मातें | श्रीकृष्णगुणीं मातें । सर्वत्र करीं वो सरतें । राणिवे बैसवी श्रोते । श्रवणाचिये | ज्ञाने.१२.१५ |
| ७८२१७. मातें | तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांघरुविशील सदैवें । तरि आतांचि हें आघवें । निर्मीन माये | ज्ञाने.१२.१७ |
| ७८२१८. मातें | आणि ये कृष्णमूर्तीची सवे । यालागीं सोय धरिली जीवें । तंव नको म्हणोनि देवें । वारिलें मातें | ज्ञाने.१२.१.२२ |
| ७८२१९. मातें | इयें दोनी सरिसीं । मजमाजीं प्रेमेंसीं । रिगालीं तरी पावसी । मातें तूं गा | ज्ञाने.१२.८.९८ |

| | | |
|---|---|---|
| ७८२२०. मातें | म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ती । इयें वोझीं नेघें मती । अखंड चित्तवृत्ती । आठवीं मातें | ज्ञाने.१२.१०.१२२ |
| ७८२२१. मातें | बुद्धीचां पाठीं पोटीं । कर्माआदि कां शेवटीं । मातें बांधणें किरीटी । दुवाड जरी | ज्ञाने.१२.११.१२६ |
| ७८२२२. मातें | परि मातें मनीं धरावें । कां मजउद्देशें करावें । हें कांहीं नको आघवें । जाऊं दे शून्यीं | ज्ञाने.१२.११.१३० |
| ७८२२३. मातें | परि मातें परम करूनि । इये अर्थीं प्रेम धरूनि । हेंचि सर्वस्व मानूनि । घेती जे पैं | ज्ञाने.१२.२०.२३३ |
| ७८२२४. मातें | जो अनन्य यापरी । मी जाहलाहि मातें वरी । तोचि तो मूर्तधारी । ज्ञान पैं गा | ज्ञाने.१३.१०.६१० |
| ७८२२५. मातें | तैसा मातें किरीटी । भजती गा पाउटी । करूनि जो दिठी । विषो सूये | ज्ञाने.१३.११.८०९ |
| ७८२२६. मातें | ते मातें किरीटी । हेंचि जाणोनियां शेवटीं । आपणपयां साटोवाटीं । मीचि होती | ज्ञाने.१३.१८.९४५ |
| ७८२२७. मातें | हा ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें । केलें असें श्रीमंतें । श्रीगुरुरायें | ज्ञाने.१३.३४.११६४ |
| ७८२२८. मातें | आतां कृपाभांडवल सोडीं । भरीं मति माझी पोतडी । करीं ज्ञानपद्यजोडी । थोरा मातें | ज्ञाने.१४.१७ |
| ७८२२९. मातें | जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं भरितें । वोसंडेल स्फूर्तीतें । रसवृत्तीचें | ज्ञाने.१४.२४ |
| ७८२३०. मातें | म्हणोनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें । तैसा नव्हे उखितें । आघवें मीचि | ज्ञाने.१४.४.१२७ |
| ७८२३१. मातें | तरी व्यभिचाररहितें चित्तें । भक्तियोगें मातें । सेवी तो गुणातें । जाकळूं शके | ज्ञाने.१४.२६.३७१ |
| ७८२३२. मातें | म्हणोनि विश्वपण जावें । मग मातें घेयावें । तैसा नव्हे आघवें । सकटचि मी | ज्ञाने.१४.२६.३८० |
| ७८२३३. मातें | ऐसेनि मातें जाणिजे । ते अव्यभिचार भक्ति म्हणिजे । येथ भेदु कांहीं देखिजे । तरी व्यभिचारु तो | ज्ञाने.१४.२६.३८१ |
| ७८२३४. मातें | याकारणें भेदातें । सांडूनि अभेदें चित्तें । आपणयासकट मातें । जाणावें गा | ज्ञाने.१४.२६.३८२ |
| ७८२३५. मातें | किंबहुना ऐसी दशा । तें ब्रह्मत्व गा सुदंशा । हें तो पावे जो ऐसा । मातें भजे | ज्ञाने.१४.२६.३९७ |
| ७८२३६. मातें | तैसा ज्ञानाचिया दिठी । जो मातें सेवी किरीटी । तो होय ब्रह्मतेचां मुकुटीं । चूडारत्न | ज्ञाने.१४.२६.४०० |
| ७८२३७. मातें | तरी कोण गा तूतें । पावोनि न येती माघौते । हें विश्वतोमुखा मातें । बुझावीं जी | ज्ञाने.१५.६.३२८ |
| ७८२३८. मातें | मग म्हणे गा महामती । मातें पावोनि न येती पुढती । ते भिन्नाभिन्न रिती । आहाती दोनी | ज्ञाने.१५.६.३३० |
| ७८२३९. मातें | एवंविध जीवलोकीं । तूं मातें ऐसा अवलोकीं । जैसा चंद्रु कां उदकीं । उदकातीत | ज्ञाने.१५.७.३४८ |
| ७८२४०. मातें | कां नाडरचि भरे शोषे । सूर्यु तो जैसा तैसाचि असे । देह होतां जातां तैसें । देखती मातें | ज्ञाने.१५.१०-११.३८७ |
| ७८२४१. मातें | तैसा चित्तीं अहंते ठावो । आणि जिभे सकळशास्त्रांचा सरावो । ऐसेनि कोडी एक जन्म जावो । परी न पविजे मातें | ज्ञाने.१५.१०-११.३९६ |
| ७८२४२. मातें | अगा सूर्योदयो जालिया । सूर्ये सूर्यचि पहावा धनंजया । तेवीं मातें मियां जाणावया । मीचि हेतु | ज्ञाने.१५.१५.४२५ |
| ७८२४३. मातें | म्हणोनि जैसा असें तैसया । मातें नेणोनि धनंजया । वेदु जाणों गेला तंव तया । जालिया शाखा | ज्ञाने.१५.१५.४३२ |
| ७८२४४. मातें | ऐसियालागीं सर्व प्रकारीं । जैसा कल्लोळु अनन्यु सागरीं । तैसा मातें अवधारीं । भजिन्नला जो | ज्ञाने.१५.१९.५६८ |
| ७८२४५. मातें | मी भोगभूमीचा रावो । आजि सर्वसुखासी ठावो । म्हणोनि इंद्रुही वावो । मातें पाहुनि | ज्ञाने.१६.१४.३५४ |
| ७८२४६. मातें | मातें गाती वानिती । नटनाचें रिझविती । तयां देईन मागती । ते ते वस्तु | ज्ञाने.१६.१५.३६१ |

| | | |
|---|---|---|
| ७८२४७. मातें | कामु करवी तें करिती । क्रोधु मारवी तें मारिती । किंबहुना मातें पुरिती । दु:खाचां गुंडां | ज्ञाने.१७.५.१०४ |
| ७८२४८. मातें | परी अर्जुना तूं तयांतें । देखसी तैं स्मर हो मातें । जे आन प्रायश्चित्त येथें । मानेल ना | ज्ञाने.१७.६.१०९ |
| ७८२४९. मातें | जे नेणणें माझें प्रकाशूनि । अन्यथात्वें मातें दाऊनि । सर्वही सर्वीं भजौनि । बुझावीतसे | ज्ञाने.१८.५४.१११४ |
| ७८२५०. मातें | हेचि होऊनि अर्थना । मीचि माझां अर्थी अर्जुना । करूनि अर्थाभिधाना । आणी मातें | ज्ञाने.१८.५४.११२० |
| ७८२५१. मातें | तया परी थडथांद । साध्यसाधनातीत शुद्ध । ते मी होऊनि एकवद । भोगी तो मातें | ज्ञाने.१८.५५.११३७ |
| ७८२५२. मातें | यालागीं तो क्रमयोगी । मी जालाचि मातें भोगी । तारुण्य कां तरुणांगीं । जियापरी | ज्ञाने.१८.५५.११४७ |
| ७८२५३. मातें | तैसा रूप होऊनि माझें । मातें क्रियावीण तो भजे । अलंकारु का सहजें । सोनयातें जेवीं | ज्ञाने.१८.५५.११४९ |
| ७८२५४. मातें | म्हणौनि तया बोलतां । बोली बोलतां मी भेटतां । मौन होय तेणें तत्त्वतां । स्तवी तो मातें | ज्ञाने.१८.५५.११५४ |
| ७८२५५. मातें | म्हणौनि करीतयाही वोजा । तें न करणें हेंचि कपिध्वजा । निफजे तिया महापूजा । पूजी तो मातें | ज्ञाने.१८.५५.११७९ |
| ७८२५६. मातें | पैं देशें काळें पदार्थें । साधूनि घेईजे मातें । तैसा नव्हे मी आयतें । सर्वांचें सर्वही | ज्ञाने.१८.५५.१२२४ |
| ७८२५७. मातें | तैसा बुद्धी वाचा कायें । जो मातें आश्रऊनि ठाये । तो निषिद्धेंही विपायें । कर्मे करूं | ज्ञाने.१८.५६.१२५१ |
| ७८२५८. मातें | तेव्हां भलतिये आवस्थे । मी तूंतें तूं मातें । भोगिसी ऐसें आइतें । वाढेल सुख | ज्ञाने.१८.६५.१३६३ |
| ७८२५९. मातें | आणि तिजें आडळ करितें । निमालें अर्जुना जेथें । तैं मीचि म्हणौनि तूं मातें । पावसी शेखीं | ज्ञाने.१८.६५.१३६४ |
| ७८२६०. मातें | तंव देवो म्हणती राहें । या बोलाचा प्रस्तावो नोहे । पैं मातें पावसी उपायें । साचचि येणें | ज्ञाने.१८.६५.१३७९ |
| ७८२६१. मातें | तैसें सर्वत्र मातें भजतां । सर्व मी होतां अहंता । नि:शेष जाऊनि तत्त्वता । मीचि होसी | ज्ञाने.१८.६५.१३८१ |
| ७८२६२. मातें | म्हणौनि मी होऊनि मातें । सेवणें आहे आयितें । तें करीं हाता येतें । ज्ञानें येणें | ज्ञाने.१८.६६.१४०५ |
| ७८२६३. मातें | तरी गीताशास्त्रनिर्मिता । जो मी सकळलोकशास्ता । तया मातें सामान्यता । बोलेल जो | ज्ञाने.१८.६७.१४९८ |
| ७८२६४. मातें | माझां सज्जनेंसिं मातें । पैशून्याचेनि आव्हाते । येक आहाती तयांतें । योग्य न म्हण | ज्ञाने.१८.६७.१४९९ |
| ७८२६५. मातें | परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें । प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा | ज्ञाने.१८.७८.१७६५ |
| ७८२६६. मातें | सायिखडेयाचें बाहुलें । चालवित्या सूत्राचेनि चाले । तैसा मातें दावीत बोले । स्वामी तो माझा | ज्ञाने.१८.७८.१७६८ |
| ७८२६७. मातें | पाहा पां मातें तुम्हांसांगडें । माहेर तेणें सुरवाडें । ग्रंथाचें हें आळियाडें । सिद्धी गेलें | ज्ञाने.१८.७८.१७७५ |
| ७८२६८. मातेचि | आणि मरणीं जया जें आठवे । तो तेचि गतीतें पावे । म्हणोनि सदां स्मरावें । मातेचि तुवां | ज्ञाने.८.६.७५ |
| ७८२६९. मातेंचि | जेणें ऐक्याचिये दिठी । सर्वत्र मातेंचि किरीटी । देखिला जैसा पटीं । तंतु एकु | ज्ञाने.६.३१.३९८ |
| ७८२७०. मातेंचि | तूं मन बुद्धि सांचेंसीं । जरी माझिया स्वरूपीं अर्पिसी । तरी मातेंचि गा पावसी । हे माझी भाक | ज्ञाने.८.७.७९ |
| ७८२७१. मातेंचि | तेंही कीर मातेंचि होये । कां जें हें आघवें मीचि आहें । परि ते भजती उजरी नव्हे । विषम पडे | ज्ञाने.९.२३.३४५ |
| ७८२७२. मातेंचि | जिहीं मातेंचि अध्ययन केलें । जे आंतबाहेरि मियांचि धाले । जयांचें जीवित्व जोडलें । मजचिलागीं | ज्ञाने.९.२५.३६१ |
| ७८२७३. मातेंचि | आपुलिया साटोवाटी । शून्य घेती उठाउठी । तेही मातेंचि किरीटी । पावती गा | ज्ञाने.१२.४.५८ |

| | | |
|---|---|---|
| ७८२७४. मातेंचि | बुद्धि अनन्यें येणें योगें । मजमाजीं जैं रिगे । तैं चित्त चैत्यत्यागें । मातेंचि भजे | ज्ञाने.१८.५७.१२६७ |
| ७८२७५. मातेंवाचूनि | तरी बहु बोलूं काई । आजि तें आनीं ठाईं । मातेंवाचूनि नाहीं । ज्ञानदेवो म्हणे | ज्ञाने.१५.१८ |
| ७८२७६. मातेंही | रश्मीचेनि आधारें जैसें । नव्हतेंचि मृगजळ आभासे । माझां ठायीं भूतजात तैसें । आणि मातेंही भावीं | ज्ञाने.९.५.८५ |
| ७८२७७. मातेचा | किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा । तो मातेचा सोयरा । केतुला पां | ज्ञाने.१२.७.८३ |
| ७८२७८. मातेचां | तें कारण मनीं धरिलें । मग सरोष बोलों आदरिलें । जैसे मातेचां कोपीं थोकलें । स्नेह आथी | ज्ञाने.२.१०.८८ |
| ७८२७९. मातेचां | जैसें मातेचां ठायीं । अपत्या अनवसरू नाहीं । स्तन्यालागूनि पाहीं । जियापरी | ज्ञाने.३.२.२९ |
| ७८२८०. मातेचां | पैं अवज्ञा आणि कामना । मातेचां ठायीं अर्जुना । केलिया दोनी पतना । हेतु होती | ज्ञाने.१८.९.२०२ |
| ७८२८१. मातेचिया | मातेचिया उदरकुहरीं । पचूनि विष्ठेचां दाथरीं । उकडूनि नवमासवरी । जन्मजन्मोनि मरती | ज्ञाने.९.२१.३३१ |
| ७८२८२. मातेचिया | किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा । तो मातेचा सोयरा । केतुला पां | ज्ञाने.१२.७.८३ |
| ७८२८३. मातेचें | परी अहितीं कोपोनि सोप । लालनीं मऊ जैसें पुष्प । तिये मातेचें स्वरूप । जैसें कां होय | ज्ञाने.१६.२.१२३ |
| ७८२८४. मातेचें | नातरी बाळकोद्देशें । मातेचें स्नेह जैसें । कां वसंतीचां स्पर्शें । मऊ मलयानिळु | ज्ञाने.१६.२.१६९ |
| ७८२८५. मात्रात्रय | तेथ आकाशीं मिळे न मिळे । तैसा धरावा धारणाबळें । जंव मात्रात्रय मावळे । अर्धबिंबीं | ज्ञाने.८.१२.११५ |
| ७८२८६. मात्रेचेनि | परी मात्रेचेनि मापें । दिव्यौषध जैसें घेपे । कां कथिलाचें कीजे रूपें । रसभावनीं | ज्ञाने.१८.३६.७७४ |
| ७८२८७. मात्रेसि | देवा तूं अक्षर । औटाविये मात्रेसि पर । श्रुति जयाचें घर । गिंवसीत आहाती | ज्ञाने.११.१८.३०७ |
| ७८२८८. माथया | जो प्रत्यग्बोधाचिया माथया । सोहंतेचां मध्यान्हीं आलिया । लपे आत्मभ्रांति छाया । आपणपां तळीं | ज्ञाने.१६.१० |
| ७८२८९. माथयावरी | प्रवर्तलाही वेगीं बहुडे । देह सांडुनि मागलीकडे । महाभूतांचिया चढे । माथयावरी | ज्ञाने.१०.३.७३ |
| ७८२९०. माथा | मग शरीरसंचु पार्था । अशेषही सर्वथा । पार्ष्णीचा माथा । स्वयंभू होय | ज्ञाने.६.१२.१९८ |
| ७८२९१. माथा | प्रणवाचा माथा बुडे । येतुलेनि अनिर्वाच्य सुख जोडे । म्हणोनि आधींचि बोलु बहुडे । तयालागीं | ज्ञाने.६.४५.४६९ |
| ७८२९२. माथा | यजन करितां कौतुकें । तिहीं वेदांचा माथा तुके । क्रिया फळेंसि उभी ठाके । पुढां जयां | ज्ञाने.९.२०.३०८ |
| ७८२९३. माथा | तेथ संजयें माथा तुकिला । अहा अमृताचा पाऊस वर्षला । कीं हा एथ असतुचि गेला । सेजिया गांवा | ज्ञाने.९.३४.५२३ |
| ७८२९४. माथा | कां साडेपंधरया रजतवणी । तैशीं स्तुतीची बोलणीं । उगियाचि माथा ठेविजे चरणीं । हेंचि भलें | ज्ञाने.१०.१५ |
| ७८२९५. माथा | अहो पुंसा आपणचि पढविजे । मग पढे तरी माथा तुकिजे । कां करविलेनि चोजें न रिझे । बाळका माय | ज्ञाने.११.१७ |
| ७८२९६. माथा | पुष्टि लागे विघरों । कांति पाहे निसरों । माथा आदरी शिरों । बागीबळ | ज्ञाने.१३.११.७५६ |
| ७८२९७. माथा | यालागीं आतां । स्तुति सांडूनि निवांता । चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें | ज्ञाने.१४.१५ |
| ७८२९८. माथा | तैसा जंव पार्था । विवेकु नुधवी माथा । तंव अंतु नाहीं अश्वत्था । भवरूपा या | ज्ञाने.१५.३.२२६ |
| ७८२९९. माथा | देवो म्हणे हां गा पार्था । तूं आपणपें देख सर्वथा । तंव श्वासूनि येरें माथा । तुकियेला | ज्ञाने.१८.१३.२९० |
| ७८३००. माथां | देखें पुढिलाचें वोझें । जरी आपुलां माथां घेईजे । तरी सांगे कां न दाटिजे । धनुर्धरा | ज्ञाने.३.२७.१७७ |

| | | |
|---|---|---|
| ७८३०१. माथां | ज्ञानदेव म्हणे मी चाडें । सद्‌गुरूंनीं केला कोडें । माथां हात ठेविला तें फुडें । बीचि वाइलें | ज्ञाने.६.४७.४९२ |
| ७८३०२. माथां | करितां तापसांची कडसणी । कवणु जवळां ठेविजैल शूळपाणी । तोही अभिमानु सांडूनि पायवणी । माथां वाहे | ज्ञाने.९.२५.३७२ |
| ७८३०३. माथां | हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकरु माथां पारुखे । तो जीवचि परि तुके । महेशेंशीं | ज्ञाने.१०.९ |
| ७८३०४. माथां | मग याहीवरी पार्था । माझां भजनीं आस्था । तरी तयातें मी माथां । मुकुट करीं | ज्ञाने.१२.१९.२१४ |
| ७८३०५. माथां | म्हणोनि गा नमस्कारूं । तयातें आम्ही माथां मुकुट करूं । तयाची टांच धरूं । हृदयीं आम्ही | ज्ञाने.१२.१९.२२१ |
| ७८३०६. माथां | नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा । जे शृंगाराचां माथां । पाय ठेविती | ज्ञाने.१३.३४.११५५ |
| ७८३०७. माथां | जयाचिया प्रतीती । विचारवीरीं समस्तीं । नेदिजेचि संसृती । माथां उधऊं | ज्ञाने.१४.१.४९ |
| ७८३०८. माथां | मज चैतन्यशंभूचां माथां । जो निक्षेपु होता पार्था । तया गौतमु जालासि आस्था- । निधी तूं गा | ज्ञाने.१५.२०.५७८ |
| ७८३०९. माथां | आणि गंगा शंभूचां माथां । पावोनि संकोचे जेवीं पार्था । तेवीं मान्यपणें सर्वथा । लाजणें जें | ज्ञाने.१६.३.२०५ |
| ७८३१०. माथां | कां पाषाणाचिया माथां । हांडी फुटली पार्था । जीवीं तैसे सर्वथा । कुटके जाले | ज्ञाने.१६.१६.३६८ |
| ७८३११. माथां | तैसा अशेषांही पुरुषार्थां । जो गोसावी हो म्हणे पार्था । तेणें श्रुतिस्मृति माथां । बैसणें घापे | ज्ञाने.१६.२४.४५९ |
| ७८३१२. माथां | माथां जाळिजती गुगुळु । पाठीं घालिजती गळु । आंग जाळिती इंगळु । जळतभीतां | ज्ञाने.१७.१९.२५६ |
| ७८३१३. माथां | नाना वसो घातला चारू । माथां तुरंबिला बुरू । न करी प्रत्युपकारू । जियापरी | ज्ञाने.१७.२०.२८१ |
| ७८३१४. माथां | तो महावाक्याचेनि नांवें । गुरुकृपेचेनि थांवें । माथां हातु ठेविला नव्हे । थापटिला जैसा | ज्ञाने.१८.१७.४०४ |
| ७८३१५. माथांचि | जो माथांचि पालाणवी । अंगा अवगुण घालवी । जीवें दांडी घेववी । ममत्वाची | ज्ञाने.१८.५३.१०६३ |
| ७८३१६. माथाही | तरी श्रद्धा न धरी जीवीं । तया माथाही न खालवी । स्वयें न करी ना करवी । अर्ध्यादिक | ज्ञाने.१७.२२.३०३ |
| ७८३१७. माथुला | आइका पाणी वोथिजावें न लगे । नवनीतीं माथुला न रिगे । तेविं लाजिलें व्याख्यान न निगे । देखोनि जयांतें | ज्ञाने.९.२१ |
| ७८३१८. मादुरी | कां मादुरी लोकांचा घोडा । गजपतिही मानी थोडा । कां कांटियेवरिलिया सरडा । स्वर्गुही नीच | ज्ञाने.१६.४.२२५ |
| ७८३१९. माधवी | ना तरी उद्यानीं माधवी घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे । आदिलापासोनि अपाडें । जियापरी | ज्ञाने.१.४३ |
| ७८३२०. माधवी | तिये विनयद्रुमाचिये आरवीं । सुरवाडली सात्त्विकांची माधवी । म्हणोनि करसंपुटपल्लवीं । तूं होतासि फळ | ज्ञाने.११.२२.३३७ |
| ७८३२१. माधवी | हे कामाची मांडवी । हे मोहवनींची माधवी । इये प्रसिद्धचि दैवी । माया हें नांव | ज्ञाने.१३.२१.९९१ |
| ७८३२२. माधवी | श्रवणसुखाचां मांडवीं । विश्व भोगी माधवी । तैसी सासिने बरवी । वाचावल्ली | ज्ञाने.१५.१४ |
| ७८३२३. माधवी | तरी अवसांत आली माधवी । ते हेतु होय नवपल्लवीं । पल्लव पुष्पपुंज दावी । पुष्प फळातें | ज्ञाने.१८.१५.३५४ |
| ७८३२४. माधवीं | लता पिके आघवी । तंव चूत बांधे पालवी । मग हात न लावित माधवीं । सोडूनि घाली | ज्ञाने.१८.२.१२४ |
| ७८३२५. माधुरी | तैसी बोली साचारी । अवतरो माझी माधुरी । माले मागूनि घरीं । गुरुकृपेचां | ज्ञाने.१४.३१ |
| ७८३२६. माधुर्य | तैसें तोडावया संदेह । तीख जैसें कां लोह । श्राव्यत्वें तरी माधुर्य । पायीं घाली | ज्ञाने.१६.२.११८ |
| ७८३२७. माधुर्य | पैं कोलिताही कोपे ऐसें । द्राक्षांचें हिरवेपण असे । तें परिपाकीं कां जैसें । माधुर्य आते | ज्ञाने.१८.३७.७९० |

| | | |
|---|---|---|
| ७८३२८. माधुर्य | समुद्रा जयाचें तोय । तोया जयाचें माधुर्य । माधुर्या सौंदर्य । जयाचेनि | ज्ञाने.१८.७८.१७२५ |
| ७८३२९. माधुर्या | स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार । मुख मोहाचें माहेर । माधुर्या जाहले अंकुर । दशन तैसे | ज्ञाने.१३.७.२६१ |
| ७८३३०. माधुर्या | समुद्रा जयाचें तोय । तोया जयाचें माधुर्य । माधुर्या सौंदर्य । जयाचेनि | ज्ञाने.१८.७८.१७२५ |
| ७८३३१. माधुर्यीं | माधुर्यीं मधुरता । शृंगारीं सुरेखता । रूढपण उचितां । दिसे भलें | ज्ञाने.१.३६ |
| ७८३३२. माधुर्यें | माधुर्यें चंद्रिका । सरिसी राया रंका । तैसा जो सकळिकां । भूतां समु | ज्ञाने.१२.१८.२०४ |
| ७८३३३. माध्यान्ह | पैं ब्रह्मा प्रात:काळु । विष्णु तो माध्यान्ह वेळु । सदाशिव सायंकाळु । बाळा यया | ज्ञाने.१४.३.१११ |
| ७८३३४. माध्यान्हीं | हां जी चौपाहारी न भरतां । कोणेही वेळे श्रीअनंता । काय माध्यान्हीं सविता । मावळतु आहे | ज्ञाने.११.३६.४९४ |
| ७८३३५. मान | हें अपार जें गगन । वर तयाही होईल मान । परि अगाध भलें गहन । हृदय याचें | ज्ञाने.२.५.४० |
| ७८३३६. मान | इहीं विवेकाची त्राय फेडिली । वैराग्याचा खाली काढिली । जितया मान मोडिली । उपशमाची | ज्ञाने.३.३७.२५२ |
| ७८३३७. मान | म्हणोनि विसुरा काय येणें । तो ईश्वरु आकळावा कवणें । जो आपुलें मान नेणें । आपणचि | ज्ञाने.५.२९.१७४ |
| ७८३३८. मान | वायांचि मान पिळी । अटुवें हियें आवळी । टिटांतु नळी । धरूनि ठाके | ज्ञाने.६.६.७७ |
| ७८३३९. मान | कैसें थोरिवेचें मान पाहें पां । जो सृष्टिबीजाचा साटोपा । परि पुनरावृत्तीचिया मापा । शीग जाहला | ज्ञाने.८.१८-१९.१६६ |
| ७८३४०. मान | मज अमेया मान । सर्वगतासी स्थान । जैसें सेजेमाजी वन । निदेला देखे | ज्ञाने.९.११.१५९ |
| ७८३४१. मान | आणि जळचरां उदधीचें मान । मशकां नोलांडवे गगन । तैसें महर्षींचें ज्ञान । नेणे मातें | ज्ञाने.१०.२.६६ |
| ७८३४२. मान | तिहीं ऋतूं समान । जैसें कां गगन । तैसें एकचि मान । शीतोष्णीं जया | ज्ञाने.१२.१८.२०२ |
| ७८३४३. मान | दाढी साउळ धरी । मान हालौनि वारी । तरी जो करी । प्रीयेचा पैसु | ज्ञाने.१३.११.७५७ |
| ७८३४४. मान | तया अचर्चाचें चिन्ह । तया अपाराचें मान । तया अमनस्काचें मन । बुद्धीही होय | ज्ञाने.१३.२१.१००२ |
| ७८३४५. मान | नाना बांधोनियां डोळे । घ्राणीं लाविजती मुक्ताफळें । तरी तयांचें काय कळे । मोल मान | ज्ञाने.१५.१०-११.३९५ |
| ७८३४६. मान | कां मोतियांची जैसी जाती । सोनयाही मान देती । नातरी मानवती । अंगेचि सडीं | ज्ञाने.१८.७८.१७३९ |
| ७८३४७. मानणयासाठीं | मग तया मानणयासाठीं । देहबंदिशाळे किरीटी । कर्माचां वज्रगांठी । कळासे तो | ज्ञाने.१८.१६.३९२ |
| ७८३४८. मानणें | मज एकासनीं बैसणें । कां तुझा बोलु न मानणें । हें वोळखीचेनि दाटपणें । बहुत घडलें | ज्ञाने.११.४२.५५४ |
| ७८३४९. मानणें | अगा उपजणें निमणें । हें साचचि जें कां मानणें । तो जीवलोकु मी म्हणें । संसारु हन | ज्ञाने.१५.७.३४७ |
| ७८३५०. मानणें | आदरें जें कां मानणें । तें आस्तिक्य मी म्हणें । तो नववा गुण जेणें । कर्म तें साच | ज्ञाने.१८.४२.८५० |
| ७८३५१. मानलयां | ऐसा जिंतिलिया रिपुवर्ग । आपु मानलयां हें जग । अपैसा योगतुरंग । स्थिर जाला | ज्ञाने.१८.५३.१०७६ |
| ७८३५२. मानलिया | मूळग्रंथींचिया संस्कृता । वरि मऱ्हाटी नीट पढतां । अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमी हें न चोजवे | ज्ञाने.१०.४३ |
| ७८३५३. मानलें | एथ ईश्वरु एकु अकर्ता । ऐसें मानलें जरी चित्ता । तरी तोचि मी हें स्वभावता । आदीचि आहे | ज्ञाने.५.१६.८४ |
| ७८३५४. मानलें | दोहीं माजि आवडे तें । जें मानलें होय चित्तें । बहुतकरूनि एकांते । बैसिजे गा | ज्ञाने.६.११.१८० |

